## अनुक्रमणिका

"अल्लाहच्या नावाने जो असीम दयावंत व परम कृपावंत आहे"

"आणि श्रद्धावंतांच्या मित्रत्वांत ते लोक अधिक जवळ असल्याचे आढळतील. ज्यांनी सांगितले होते की आम्ही ख्रिश्चन आहोत, हे अशा कारणास्तव की त्यांच्यात उपासना मग्न विद्वान व विरक्त साधू आढळतात आणि त्यांच्यात अहंकार नाही."

*(दिव्य कुरआन - ५:८२)*

(हे पैगंबर (स.)!) सांगा, "हे ग्रंथधारकांनो या एका अशा बाबीकडे जी आमच्या आणि तुमच्या दरम्यान समान आहे, हे की आपण अल्लाहशिवाय कोणाचीही भक्ती करू करू नये, त्याच्याबरोबर कोणासही भागीदार ठरवू नये, आणि आपल्यापैकी कोणीही अल्लाहशिवाय इतर कोणास आपला पालनकर्ता बनवू नये." या आवाहनाला स्वीकारण्यापासून ते जर पराङमुख झाले तर स्पष्ट सांगून टाका की साक्षी राहा आम्ही तर मुस्लिम (केवळ अल्लाहची भक्ती करणारे व त्याचे आज्ञापालन करणारे) आहोत."

*(दिव्य कुरआन - ३:६४)*

"परंतु सर्वच ग्रंथधारक सारखे नाहीत. यांच्यामध्ये काही लोक असे देखील आहेत जे सरळ मार्गावर कायम आहेत. रात्री अल्लाहच्या वचनांचे पठण करतात व त्याच्यापुढे नतमस्तक होतात. अल्लाह आणि मरणोत्तर दिनावर श्रद्धा बाळगतात. सदाचाराचा आदेश देतात व दुराचारांवर प्रतिबंध घालतात आणि पुण्यकार्यात क्रियाशील राहतात हे सदाचारी लोक आहेत." *(दिव्य कुरआन - ३:११३-११४)*

# प्रस्तावना

प्रेषित्वाविषयी विश्वास इस्लामी श्रद्धेच्या तीन मूलभूत कलमांपैकी एक असून अन्य दोहोंत एकेश्वरत्व (अर्थात ईश्वराचे एकमेवाद्वितीय त्याच्या व्यक्तित्व आणि विशेष गुणधर्मात) तसेच परलोकत्व म्हणजे पुनरूत्थानाच्या दिवशी समस्त मानवाचे पुनर्जीवित होणे, त्यांच्या वसुंधरेवरील कर्म व कृत्यांचा न्यायनिवाडा होऊन त्या अनुषंगाने त्यांना स्वर्गाचे बक्षीस किंवा नरकाग्नीची शिक्षा या दोहोंपैकी एक प्रदान केले जाते.

संपूर्ण मानवी इतिहासात अगणित पैगंबरांकडे प्रदीर्घ शृंखलेतील आकाशीय मार्गदर्शन म्हणून अवतीर्ण झालेला कुरआन हा अंतिम धर्मग्रंथ असून त्यात किमान २४ संदेष्ठांचा उल्लेख आढळतो. कोणताही भेदभाव न करता इस्लामी श्रद्धेनुसार प्रत्येक अनुयायास सर्व पैगंबरांवर ईमान बाळगणे आवश्यक आहे.

पवित्र कुरआनात येशू यांचा कमीतकमी तीस आयती श्लोकांमध्ये उल्लेख करण्यात आला असून ज्यात कैवल्यासाठी त्याचा अलौकिक जन्म, त्याची स्तुती, दर्जा, विशेष धर्मकार्य आणि त्यांच्या धार्मिक प्रसारकार्यावरील विलक्षण प्राबल्याचे वर्णन करण्यात आले आहे.

येशूची जन्मदात्री मेरी अन्य पैगंबरांच्या मातेहून सर्वथा भिन्न असून जिच्याबद्दल कुरआनात किमान बारा श्लोकांत तिचे कौमार्य, विस्मयचकित येशूबद्दलचे मातृत्व, तिच्या थोर पदाचे श्रेष्ठत्व, दर्जा तद्वत वसुंधरेवरील महिलावर्गात निवडक स्त्री म्हणून विशेष उल्लेख आढळतो.

या छोट्याशा ग्रंथात पैगंबर येशू आणि त्यांची माता मेरी यांच्याशी संबंधित कुरआनातील श्लोकांचे भाषांतर सादर करण्यात आले असून त्याचा लाभ विशेषत: आमच्या ख्रिस्ती बांधवांना जे पैगंबर येशू आणि मेरीविषयी कुरआनचे मत जाणून घेण्यास इच्छुक आहेत, ज्यामुळे इस्लाम धर्माबद्दल त्यांची शोधवृत्ती परिपूर्ण होईल.

आमच्या ख्रिस्ती बांधवांच्या सवलतीकरिता आणि त्यांच्या विचारांना अधिक चालना मिळून पैगंबर येशू यांच्याशी निगडीत सत्यानुसार त्यांचे चांगले मत तयार व्हावे म्हणून बायबलच्या (जुना व नवा करार) भक्कम संदर्भ देऊन त्यांना निक्षून खात्री करून घेण्यास्तव कुरआनातील समर्पक व सापेक्ष विधानांची जोड देण्यात आलेली

आहे. ख्रिस्ती धर्मशास्त्री इतिहासवेत्त्यांच्या साहित्यातून काही महत्त्वपूर्ण संदर्भ दिले आहेत. जसे अल मुहैमिन (५:४८) अर्थात सर्व सत्याचे रखवालदार, रक्षक व रक्षणकर्ता हे मागील ईशधर्मग्रंथात (बायबलसह) जे मानवी हस्ताक्षेपाशिवाय अद्यापही जसेच्या तसे स्पष्टपणे उपलब्ध आहेत.

दयावान अल्लाहचा आशीर्वाद आणि मार्गदर्शन ईशसत्याचा प्रामाणिकपणे शोध घेणाऱ्यांना लाभो! आमीन!

**मुहम्मद जैनुल आबिदीन मन्सुरी**

नवी दिल्ली

५ डिसेंबर २००७

# प्राक्कथन

हातातील हा ग्रंथ येशू (त्यांना शांती लाभो) आणि त्यांची धर्मनिष्ठ माता मेरी यांच्याबद्दल कुरआन काय प्रतिपादन करतो याचा प्रयत्न असून त्यांच्याविषयी कुरआनात आढळणाऱ्या विविध सूरह आध्यायांच्या माध्यमातून लेखकाने प्रारंभी सुरेखपणे विभिन्न शीर्षकांना संक्षिप्त टिपणीची जोड देऊन कुरआनचे त्यांच्या संबंधीचे निश्चित, सकारात्मक आणि नकारात्मक प्रतिपादनांचा अंतर्भाव करण्यात आला आहे.

येशू (त्यांना शांती लाभो) यांच्याविषयी त्यांनी नोंद केली आहे की कुरआन वारंवार सांगतो येशू (त्यांना शांती लाभो) ईश्वराचे सुपुत्र किंवा ईशजीव नव्हते. किंबहुना ते एक साधे मनुष्य आणि नावलौकिक संपादन करणारे अल्लाहचे पैगंबर होते. नि:संशय येशू (त्यांना शांती लाभो) आश्चर्यकारकरित्या धर्मनिष्ठ कुमारिका मातेच्या उदरात जन्मले. ईश्वराकडून चमत्कारपूर्ण शक्ती लाभून त्यांनी दृष्टीहिनांना डोळस आणि मृतात्म्यांना पुन:श्च जीवन प्रदान केले. परंतु त्यांचा विस्मयजनक जन्म आणि आश्चर्यकारक क्षमतेने त्यांना कदापि ईश्वर बनवले नाही. कुरआन सदैव याचा इन्कार करतो की कोणत्याही वेळी त्यांनी ईश्वर असल्याचा अधिकार वर्तवला नाही. कुरआन हेसुद्धा प्रतिपादन करतो की त्यांनी स्वत:ला ईश्वराचा पुत्र संबोधले जाण्यास नकार दिला. परंतु जर ते आपणास ईश्वराचा पुत्र म्हणवून घेत, त्याचा अर्थ त्यांच्यावर ईश्वराचा आत्यंतिक लोभ होता. डेव्हीड यांनीदेखील बायबलमध्ये देवाचा पुत्र म्हणून त्यांचा उल्लेख केला आहे. परंतु ते ईशजीव नव्हते असे आवार्जून सांगितले आहे. शिवाय त्यांचे अनुयायी येशू (त्यांना शांती लाभो) यांना ईश्वर मानत नव्हते. म्हणून त्यांची पूजा किंवा प्रार्थना या दोहोंपैकी एकही त्यांनी केले नाही. त्यांचे प्रमुख शिष्य पीटर यांना त्यांच्याविषयी पृच्छा करण्यात आली तेव्हा ते फक्त म्हणाले, 'ते पैगंबर होते.' येशूसंबंधी देवत्वाचा हक्क अर्वाचिन काळातील अलीकडील कल्पना असून जो ख्रिस्तीजनांच्या श्रद्धेचा शतकांपूर्वीचा भाग बनला आहे.

तसेच मेरी यांच्याविषयीच्या ग्रंथाचे संकलक मन्सुरी यांनी म्हटले आहे की कुरआन त्यांना धार्मिक सभ्य कुमारिका महिला संबोधतो. ज्यांनी स्वत:ला ईश्वर उपासनेत समर्पित केले. ईश्वराने त्यांना देवदूताद्वारे आपला आशीर्वाद दिला जो

पाळण्यात पहुडला होता. लोकांशी बाल्यावस्थेतच सुसंवाद करू लागला. जे तिच्या धर्मनिष्ठ मातेबद्दल निंदानालस्ती करीत होते. येशू म्हणाला, "खरोखर मी अल्लाहचा सेवक आहे. त्याने मला ग्रंथ प्रदान केला, पैगंबर बनविले आणि ज्या ज्या ठिकाणी मी गेलो तिथे आशीर्वाद, आज्ञा, प्रार्थना आणि सहाय्य प्रदान करून मला माझ्या मातेप्रति कर्तव्यतत्पर (कर्तव्यनिष्ठ) बनविले."

याची नोंद अवश्य घेतली पाहिजे की कुरआनने कधीच असे म्हटले नाही की मेरीचा जोसेफशी वाङनिश्चय झाला होता. जसे आपणास ख्रिस्त गॉस्पल्समध्ये आढळते. काय हे विलक्षण नव्हे की टाळ्या वाजवून वाहवाह करण्यासारखे नव्हते की पवित्र कुमारिकेस जोसेफची विवाहीत म्हणून सादर करण्यात आले आहे. सारांश, कुरआन ज्या मार्गाने मेरीबद्दल गॉस्पलच्या सांगण्यावरून प्रतिपादन करतो ती खूपच सुंदर, आकर्षक, निष्पाप अन् गोजिरवाणी वाटते.

मला खात्री आहे जे येशू आणि मेरीसंबंधी सत्य जाणून घेण्यास इच्छुक आहेत त्यांच्यासाठी हा ग्रंथ सहाय्यभूत ठरणार आहे. त्यांच्यावर अल्लाहचा कृपावर्षाव अन् आशीर्वाद असो. अल्लाह लेखकाच्या भाषांतराच्या सेवेचा स्वीकार करून त्यांना शुभाशीर्वाद प्रदान करो, ही प्रार्थना.

नवी दिल्ली

१७-१२-२००७

**प्रोफे. मुहम्मद अब्दुल हक अन्सारी**

डायरेक्टर, इस्लामी अकादमी.

# येशू ख्रिस्त (त्यांना शांती लाभो)

## येशू (त्यांना शांती लाभो) ईश्वराचे संदेष्टा

येशू ख्रिस्त एक संदेशवाहक... आणि ईश्वराचे संदेष्टा यापेक्षा अधिक काही नव्हते. त्यांनी तसेच त्यांच्या मातेनेसुद्धा कधी ईशत्वाचा अधिकार दर्शविला नाही. ईश्वराच्या अन्य सृष्टीजिवांप्रमाणे ते आपले नित्याचे भोजन घेत असत.

"मरयमपुत्र येशू याशिवाय काही नाही की तो फक्त एक पैगंबर होता. त्याच्या पूर्वी देखील अनेक पैगंबर होऊन गेले होते. त्याची आई एक सत्यवादी [१] स्त्री होती आणि ते दोघे (इतर माणसा प्रमाणेच) अन्न [२] भक्षण करीत होते. पहा, आम्ही कशा प्रकारे त्यांच्या समोर सत्यवचने स्पष्ट करतो. शेवटी पहा, ते कुठे उलट परतून जातात." *(दिव्य कुरआन - ५:७५)*

मूल उद्‌गारले, "मी अल्लाहचा दास आहे. त्याने मला ग्रंथ दिला आणि पैगंबर बनविले आणि समृद्धशाली बनविले, जेथे कोठे मी असेन आणि नमाज व जकात सुनियमित करण्याची आज्ञा दिली. जोपर्यंत मी जिवंत असेन आणि आपल्या आईसंबंधी कर्तव्यपालन करणारा बनविले. आणि मला दुर्वर्तनी आणि कठोर बनविले नाही. सलाम आहे माझ्यावर! जेव्हा मी जन्मलो आणि जेव्हा मी मरेन आणि जिवंत करून मला उठविले जाईल. हा आहे मरयम पुत्र ईसा आणि ही आहे त्याच्यासंबंधी ती सत्य गोष्ट ज्यात लोक संशय घेत आहेत. अल्लाहचे हे काम नव्हे की त्याने एखाद्याला पुत्र बनवावे. तो पवित्र अस्तित्व आहे. तो जेव्हा एखाद्या गोष्टीचा निर्णय घेतो तेव्हा म्हणतो की अस्तित्वात ये आणि ती अस्तित्वात येते." *(दिव्य कुरआन - १९:३०-३५)*

## येशू (त्यांना शांती लाभो) यांना प्राप्त झालेत स्पष्ट संकेत

येशू (त्यांना शांती लाभो) यांचा जन्म आश्चर्यकारक आणि अलौकिक होता. त्यांना मानवी पितृछत्र लाभले नव्हते. यास्तव कुरआनमध्ये त्यांना मरयमचे सुपुत्र संबोधण्यात आलेले आहे. ईश्वराने स्वत:च्या शब्दाद्वारे पवित्र आत्म्यासह त्यांना

---

१. ती सत्यवान होती आणि ईश्वराची माता किंवा तिचा सुपुत्र ईश्वर असल्याचा हक्क दाखविला नाही.

२. नित्याचे भोजन घेई, जसे अन्य ईश्वराच्या मानवप्राण्याने देवत्व आणि ईश्वर असल्याच्या अधिकाराचा विरोध केला.

आत्मिक शक्ती प्रदान केली होती. स्पष्ट संकेताद्वारे कुरआन त्यांच्यासंबंधी अपूर्व अशा चमत्कारपूर्ण घटनांची माहिती उपलब्ध करतो.

"आम्ही मूसा (अ.) ला ग्रंथ दिला त्यानंतर सतत पैगंबर पाठविले, शेवटी मरयमपुत्र ईसाला स्पष्ट संकेत देऊन पाठविले आणि पवित्र आत्म्याद्वारे त्याला मदत केली. पण तुमची ही कोणती पद्धत आहे की ज्या ज्या वेळी एखादा पैगंबर तुमच्या इच्छेविरुद्ध एखादी गोष्ट घेऊन तुमच्याकडे आला तेव्हा तुम्ही त्याविरुद्ध बंडखोरी केलीत.?" *(दिव्य कुरआन - २:८७)*

"आणि जेव्हा ईसा (अ.) स्पष्ट संकेत घेऊन आला होता, तो म्हणाला होता की मी तुमच्याकडे विवेक घेऊन आलो आहे आणि अशा कारणास्तव आलेलो आहे की तुम्हावर त्या काही गोष्टींच्या हकीगतीचा उलगडा करावा. ज्यात तुम्ही मतभेद दर्शवीत आहात. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञापालन करा."

*(दिव्य कुरआन - ४३:६३)*

"हे पैगंबर (जे आमच्याकडून मानवाच्या मार्गदर्शनाकरीता नियुक्त झाले.) आम्ही यांना एक दुसऱ्यापेक्षा वरचढ दर्जे बहाल केले. यांच्यापैकी कोणी असा होतो ज्याच्याशी स्वत: अल्लाहने संभाषण केले, कुणाला त्याने दुसऱ्या प्रकारचे उच्च दर्जे प्रदान केले. आणि शेवटी मरयमपुत्र ईसा येशू (अ.) यांना दिव्य संकेत बहाल केले. आणि पवित्र आत्म्याने त्याला सहाय्य केले." *(दिव्य कुरआन - २:२५३)*

"आणि मरयमपुत्राला व त्याच्या आईस आम्ही एक संकेत बनविले आणि त्यांना एका पठारावार ठेवले जी समाधानाची जागा होती आणि त्यात झरे वाहात होते." *(दिव्य कुरआन - २३:५०)*

## ईश्वराच्या पैगंबरांमध्ये कोणतेही भेद नाहीत

इस्लामचे अनुयायी (अन्य धर्मिय अनुयायांप्रमाणे) असा विचार कदापि प्रतिपादन करू शकत नाहीत. ज्यात 'माझे पैगंबर', 'तुमचे पैगंबर', 'त्यांचे पैगंबर' या संज्ञेचा उपयोग केला जाईल. कुरआन प्रत्येक मुस्लिमास आज्ञा करतो की तितकीच दृढ श्रद्धा अल्लाहच्या सर्व पैगंबरांवर बाळगावी. त्यांच्याविषयी कोणताही सापत्नभाव व फरक केला जाऊ नये.

"आम्ही श्रद्धा ठेवली अल्लाहवर आणि त्या मार्गदर्शनावर जे आमच्याकडे अवतरले आणि जे इब्राहीम, इस्माईल, याकूब आणि याकूबच्या संततीकडे अवतरले. जे मूसा, ईसा आणि दुसऱ्या सर्व पैगंबरांना त्यांच्या पालनकर्त्याकडून दिले गेले. आम्ही

त्यांच्यात कोणताही भेदभाव करीत नाही आणि आम्ही अल्लाहलाच समर्पित झालो आहोत.'' *(दिव्य कुरआन - २:१३६)*

''आम्ही अल्लाहला मानतो, त्या शिकवणींना मानतो जी आम्हावर उतरली आहे. त्या शिकवणींना देखील मान्य करतो ज्या इब्राहीम (अ.), इस्माईल (अ.), इस्हाक (अ.), याकूब (अ.) च्या संततीवर उतरल्या होत्या आणि त्या आदेशांवर देखील श्रद्धा ठेवतो जे मूसा (अ.) व ईसा (अ.) आणि इतर पैगंबरांना त्यांच्या पालनकर्त्याकडून दिले गेले. आम्ही त्यांच्यापैकी एकाच्यामध्ये भेदभाव करीत नाही आणि आम्ही अल्लाहच्या आदेशांच्या अधीन (मुस्लिम) आहोत.'' *(दिव्य कुरआन - ३:८४)*

## येशू (त्यांना शांती लाभो) अन्य पैगंबरांसमान आहेत

येशू (त्यांना शांती लाभो) अन्य सर्व पैगंबरांसारखे पैगंबर होते. थेट पैगंबर नूहपासून पैगंबर मुहम्मद (त्यांना शांती लाभो) पर्यंत त्या सगळ्यांत एक गोष्ट मात्र समान होती, ती म्हणजे ईशप्रकटीकरण व अवतरण होय.

१. ट्राईब्ज म्हणजे जेकबचे वंशज जे ईश्वराकडून पैगंबर म्हणून निवडले गेले होते. त्यांच्यावर देणगी म्हणून ईशआविष्करण होत राहिले.

२. त्यांचा संदेश मूलतत्त्वात आणि आवश्यक गोष्टीत ईश्वराचे एकमेवाद्वितीय, परलोकवाद आणि प्रेषित्व एक आणि समान आहेत, इस्लामचा मूलाधार.

३. येशू (त्यांना शांती लाभो) च्या प्रेषित्वानुसार मार्क (६ : ४) सुद्धा पाहावे ज्यात त्यांचा पैगंबर म्हणून उल्लेख आहे.

## येशूचा शेवट आणि क्रूसावर चढवणे यापैकी एकही नाही

लक्षात ठेवण्यासारखे आहे. येशू (त्यांना शांती लाभो) नंतरच्या अलिकडील काळात बेसिलीडन्स हा ख्रिस्ती संप्रदाय विश्वास करीत नव्हता की ख्रिस्ताला क्रूसावर ठार मारण्यात आले. त्यांच्या श्रद्धेनुसार येशूऐवजी दुसरा कोणीतरी त्यांच्या बदल्यात होता. कुरआनचे मत आहे येशूचा अंत किंवा यहुद्यांकडून वधस्तंभावर चढवून जिवानिशी मारणे या दोहोंपैकी एकही घडले नाही. तथापि काही उघड परिस्थितीत त्यांच्या शत्रूंच्या मनातील चुकीच्या कल्पना कारणीभूत ठरल्या आहेत. ते म्हणतात -

''आणि खुद्द सांगितले की आम्ही पैगंबर मसिह मरयमपुत्र ईसा (अ.) याला ठार केले आहे. खरे पाहता प्रत्यक्षात यांनी त्याला ठार ही केले नाही की क्रूसावर

देखील चढवले नाही. परंतु घटना यांच्याकरिता संदिग्ध बनविण्यात आली. आणि ज्या लोकांनी यासंबंधी मतभेद दर्शविले आहे. ते देखील खरे पाहता शंकेत गुरफटले आहेत. यांच्याजवळ या घटनेसंबंधी काहीच ज्ञान नाही. केवळ अनुमानाचे अनुसरण आहे. त्यांनी मसिहला नक्कीच ठार केलेले नाही.'' *(दिव्य कुरआन - ४:१५७)*

## येशू यांनी अनेकेश्वरत्वाचा इन्कार केला

पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) म्हणतात, मार्क यांच्या कथनानुसार (१२:२९) सर्वप्रथम ईश्वरी आज्ञा आहेत. 'ऐका! अहो इस्त्राईल आमचा स्वामी सर्वोच्च ईश्वर आहे. ख्रिस्ताने सत्ताधारी राज्यकर्त्यांना धमकावले, त्याला उत्कृष्ठ मालक म्हणून साद घातल्याबद्दल. लूकच्या शब्दांत (१८:१९) 'मला चांगला म्हणून का हाक मारता? एकाव्यतिरिक्त कोणी चांगला नाही. तो आहे ईश्वर!' जॉनच्या म्हणण्यानुसार, (२०:१७) ख्रिस्ताने मेरीला म्हटले, 'हे सुधारलेली पतिता स्त्री! जा माझ्या बांधवांकडे आणि त्यांना सांग. मी वरचढ आहे. माझा पिता आणि तुझा पिता तसेच माझ्या ईश्वराकडे व तुझ्या ईश्वर. मॅथिव (४:१०) यांच्या कथनानुसार ईश्वरापेक्षा अन्य देवतांच्या उपासना करण्यापासून ख्रिस्ताने सैतानाला धमकावले.

पैगंबर येशू यांचा जसा कुरआनशी संबंध आहे, इस्त्राईलच्या संततीला गंभीर परिणामापासून इशारा दिला, जर ते अन्य देवतांची ईश्वराच्या बरोबर आराधना करतील. पवित्र कुरआन येशूबद्दल खाली दिलेल्या श्लोकात उल्लेख करताना प्रतिपादन करतो,

''नक्कीच त्या लोकांनी द्रोह केला. ज्यांनी म्हटले की अल्लाह मरयम पुत्र मसिह (येशू) आहे. वास्तविक पाहता मसिह (अ.) ने सांगितले होते की, 'हे बनी इस्त्राईल अल्लाहची भक्ती करा जो माझा व तुमचासुद्धा पालनकर्ता[१] आहे. ज्याने एखाद्याला अल्लाह समवेत सहभागी ठरवले त्याच्यावर अल्लाहने स्वर्ग प्रतिबंधित केला आणि त्याचे स्थान नरक आहे व अशा अत्याचाऱ्यांचा कोणीच सहाय्यक नाही.''

*(दिव्य कुरआन - ५:७२)*

---

१. पाहा परिशिष्ट 'अ'

## पूर्वीच्या नास्तिकांचे अनुकरण

सगळ्या प्राचीन पौराणिक कथांमध्ये कल्पित बोधकथा व दंतकथांमध्ये मानवी प्राण्याचा देव किंवा देवाचा पुत्र असे वर्णन करण्यात आले आहे. या धर्मभोळ्या दंतकथा जुन्या अज्ञानकाळात विकसित झाल्या. जेव्हा ईश्वराच्या पैगंबरांच्या शिकवणी विस्मृत अथवा अदृश्य झाल्या होत्या. परंतु असा धर्मभोळेपणा क्षम्य नव्हता ज्या वेळी ईश्वराच्या पैगंबरांनी निश्चित आणि स्पष्टपणे त्यांचा ईश्वराशी असलेल्या सत्य संबंधाचा खुलासा केला. विशेषत्वाने पैगंबर मूसा आणि पैगंबर ईसा (दोहोंना शांती लाभो) यांनी केला. पवित्र कुरआन कपोलकल्पित विश्वासाचे खंडन करतो. जे उजैर किंवा ख्रिस्त ईश्वराचे सुपुत्र होते. यहुदी आणि ख्रिस्तजनांकडून बाळगण्यात आलेला विश्वास पूर्वीच्या नास्तिकांचे अनुकरण होय.

''यहुदी म्हणतात की, 'उजैर' अल्लाहचा पुत्र आहे. आणि 'ईसाई' म्हणतात की मसिह (येशू) अल्लाहचा पुत्र आहे. या अवास्तव गोष्टी आहेत, ज्या ते आपल्या तोंडातून काढतात. हे त्या लोकांचे अंधानुकरण आहे, जे त्यांच्यापूर्वी द्रोहामध्ये गुरफटले होते.''
*(दिव्य कुरआन - ९:३०)*

## पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) यांचे धर्मकार्य

पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) यांचे धर्म प्रचाराचे कार्य इतर दुसऱ्या पैगंबरांहून वेगळे नव्हते. ते एकाच व तशाच प्रकारच्या पैगंबर कार्याचा विस्तार होता. पूर्वीच्या आधीच्या पैगंबरांवर अवतरित झालेले धर्मग्रंथ अन ईश्वरी मार्गदर्शन शिल्लक राहिलेल्या खोट्या मजकूराची येशूने सत्याची जशीच्या तशी जपणूक करण्याचे कार्य केले.

''मग आम्ही त्या पैगंबरानंतर मरयमपुत्र ईसाला पाठविले. तौरातपैकी जे काही त्याच्यासमोर उपलब्ध होते. ते त्याची सत्यता प्रमाणित करणारा होता आणि आम्ही त्याला इंजील (नवा करार) प्रदान केले. ज्यात मार्गदर्शन व दिव्य प्रकाश होता. आणि तो ग्रंथदेखील तौरातपैकी जे काही त्याकाळी उपलब्ध होते त्यातील सत्य प्रमाणित करणारे होते. तसेच अल्लाहचे भय बाळगणाऱ्या लोकांसाठी पुरेपूर मार्गदर्शन व उपदेश होता.''
*(दिव्य कुरआन - ५:४६)*

## पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) आणि ट्रिनिटी

कोणत्याही विशिष्ठ व्यक्ती विषयी आस्थेचा अतिरेक आणि प्रेम लोकांना चुकीची कृत्ये व क्रियाद्वारे निराधार विश्वासाकडे घेऊन जातो. त्याचप्रमाणे धर्मात लोकांचे अधिक्य, अतिशयोक्ती आणि असमतोल दृष्टीकोन संप्रदायास वास्तविक धर्माविरुद्ध नेत असतो. दिव्य कुरआन येशू ख्रिस्ताच्या सत्य व निर्मळ कर्म आणि मार्गाची रचना असल्यामुळे ग्रंथधारकांना ईश्वरवादापासून प्रतिबंध घालतो.

"हे ग्रंथधारकांनो, आपल्या धर्मात अतिरेक करू नका. आणि अल्लाहसोबत सत्याशिवाय इतर कोणतीही गोष्ट जोडू नका. मसिह मरयमपुत्र ईसा या व्यतिरिक्त इतर काहीच नव्हता की तो अल्लाहचा एक पैगंबर होता आणि एक आदेश होता. जो अल्लाहने मरयमकडे पाठविला. आणि अल्लाहकडून एक आत्मा होता. (मरयमच्या गर्भात ज्याने मुलाचे रूपधारण केले.) म्हणून तुम्ही अल्लाह व त्याच्या पैगंबरांवर श्रद्धा ठेवा असे म्हणून. की 'तीन' आहे, परावृत्त व्हा. हे तुमच्याच हिताचे आहे. अल्लाह तर फक्त एकच आहे. तो पवित्र आहे यापासून की त्याचा कोणी पुत्र असावा. पृथ्वी व आकाशातील साऱ्या वस्तू त्याच्या मालकीच्या आहेत आणि त्यांच्या पालनासाठी व देखरेखीसाठी केवळ तोच पुरेसा आहे." *(दिव्य कुरआन - ४:१७१)*

## ईश्वराचा करारनामा आणि अन्य पैगंबर

येशू आणि दुसऱ्या पैगंबरांसंबंधी समस्त जीवित मानवी प्राण्यांसाठी सोयीस्करपणे ईशकायदे (त्यांच्या स्वतंत्र आवडीनुसार) आचरणात आणण्याकरिता सर्वच पैगंबरांना विपूल करार कोणताही लोभ न बाळगता सक्ती व गांभीर्याने धर्मकार्य ईशसत्य निर्भयपणे अंमलात आणण्यासाठी ईशसेवेत तत्पर राहिले पाहिजे. अर्थात सगळ्या परिस्थितीत ईशआज्ञा पूर्ण विश्वासाने ईश्वराने त्यांचे पैगंबर येशूकडून करवून घेतल्या.

"आणि (हे पैगंबर (स.)) स्मरण करा त्या कराराचे जो आम्ही सर्व पैगंबरांकडून तसेच तुमच्याकडून देखील करून घेतला आहे. नूह (अ.) व इब्राहीम (अ.) आणि मूसा (अ.) व मरयमपुत्र ईसा (अ.) कडून देखील आम्ही पक्के वचन घेतले आहे.जेणेकरून खऱ्या लोकांना (त्यांचा पालनकर्ता) त्यांच्या सचोटीसंबंधी विचारणा करील आणि अश्रद्धावंतांसाठी तर त्याने यातनादायक प्रकोप तयार ठेवलाच आहे."

*(दिव्य कुरआन - ३३:७-८)*

"त्याने तुमच्यासाठी धर्माची तिच पद्धत निश्चित केली आहे. ज्याची आज्ञा त्यांना नूह (अ.) ला दिली होती आणि ज्याला (हे मुहम्मद (स.)) आता तुमच्याकडे आम्ही दिव्य बोधाद्वारे पाठविले आहे आणि ज्याचा आदेश आम्ही इब्राहीम (अ.) आणि मूसा (अ.) व ईसा (अ.) यांना दिलेला आहे. या ताकीद सह की प्रस्थापित करा या धर्माला आणि यात विभागणी होऊ देऊ नका हिच गोष्ट या अनेकेश्वरवाद्यांना अत्यंत अप्रिय झाली आहे. जिचे (हे मुहम्मद (स.)) तुम्ही यांना आमंत्रण देत आहात. अल्लाह ज्याला इच्छितो तो आपला बनवितो आणि आपल्याकडे येण्याचा मार्ग त्यालाच दाखवतो. जो त्याच्याकडे रूजू होत असतो." *(दिव्य कुरआन - ४२:१३)*

## पैगंबर येशू यांचे मुहम्मद (स.) यांच्याविषयी भविष्य

कुरआनच्या प्रतिपादनानुसार संदेष्टा येशू (त्यांना शांती लाभो) यांनी नि:संदिग्धपणे सत्यविधान केले की पैगंबर मुहम्मद (स.)[१] यांचे लवकरच शुभागमन होणार आहे.

"आणि स्मरण करा मरयमपुत्र ईसाची गोष्ट जी त्याने सांगितली होती, 'हे बनी इस्त्राईल! मी तुमच्याकडे पाठविलेला अल्लाहाच पैगंबर आहे. सत्यता प्रमाणित करणारा आहे. त्या तौरातची जी माझ्यापूर्वी आलेली हजर आहे. आणि खुशखबर देणारा आहे. एका पैगंबराची जो माझ्यानंतर येईल ज्याचे नाव अहमद असेल. परंतु जेव्हा तो त्यांच्याजवळ उघड उघड संकेत घेऊन आला. तेव्हा ते म्हणाले, ही तर चक्क फसवेगिरी आहे." *(दिव्य कुरआन - ६१:६)*

## पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) यांचे चमत्कार

पवित्र कुरआनात पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) यांच्या अनेकविध चमत्कारांचा उल्लेख करण्यात आलेला आहे. तो म्हणजे बाल्यावस्थेत पाळण्यातील संवाद जसे सामान्यत: मनुष्य परिपक्व अवस्थेतच बोलत असतो. चिकणमातीचे हुबेहूब पक्षी तयार करून श्वासोश्वासद्वारा खऱ्याखुऱ्या पक्ष्यात त्याचे रूपांतर करणे, जन्मत: दृष्टीहीन

१. अरेबिक 'अहमद' (किंवा मुहम्मद) बहुतकरून 'Periclytos' या ग्रीक दुसऱ्याच्या एखाद्याने बोलाविल्यावर एक दयाळू मित्र Comferter पेक्षा (John - XIV - 16, XV-26, XVI-7) (जुना करारसुद्धा पाहा Habakkuk 3:3, Deuteronomo 33:2)

व्यक्तीला दृष्टी प्रदान करून डोळस बनविणे. महारोगी आणि मृत मनुष्याला जिवंत करणे हे चमत्कार त्यांचे स्वत:चे नव्हते किंबहुना ईश्वरेच्छा व शक्तीमुळेच घडत होते.

आणि जेव्हा दूतांनी म्हटले, 'हे मरयम, अल्लाह तुला आपल्या एका आदेशाची शुभवार्ता देत आहे त्याचे नाव मरयमपुत्र मसिह ईसा[१] असेल व तो इहलोकात व परलोकात प्रतिष्ठित राहील. अल्लाहच्या निकटवर्ती दासांमध्ये त्याची गणना होईल. तो लोकांशी पाळण्यात[२] देखील संभाषण करील आणि मोठा होऊन सुद्धा आणि तो एक सदाचारी पुरुष असेल. *(दिव्य कुरआन - ३:४५-४६)*

(आणि जेव्हा पैगंबर म्हणून बनी इस्त्राईलपाशी आला, तेव्हा त्याने सांगितले.)

'मी तुमच्या पालनकर्त्याकडून तुमच्या जवळ संकेतचिन्ह घेऊन आलो आहे. मी तुमच्यासमोर मातीपासून पक्ष्याचा आकाराचा एक पुतळा तयार करतो आणि त्याला फुंकर मारतो. तो अल्लाहच्या आदेशाने पक्षी बनतो. मी अल्लाहच्या आज्ञेने जन्मजात आंधळ्याला व महारोग्याला बरे करतो आणि त्याच्या आज्ञेने मृताला जिवंत[३] करतो.'

*(दिव्य कुरआन - ३:४९)*

मग कल्पना करा त्या प्रसंगाची जेव्हा अल्लाह सांगतात की, 'हे मरयम पुत्र ईसा, स्मरण कर माझ्या त्या देणगीची, जी मी तुला व तुझ्या मातेला प्रदान केली होती. मी पवित्र आत्म्यामार्फत तुला सहाय्य केले. तू पाळण्यात देखील लोकांशी संभाषण करीत होतास आणि वय वाढल्यानंतर सुद्धा. मी तुला ग्रंथ, शहाणपणा, तौरात आणि इंजिलचे शिक्षण दिले, तू माझ्या आज्ञेने पक्षाकृति मातीचा पुतळा बनवून त्यात फुंकर घालत असे. तू जन्मजात आंधळ्याला आणि महारोग्याला माझ्या आज्ञेने रोगमुक्त करीत असे. तू मृतांना माझ्या आज्ञेने बाहेर काढत असे.[४] *(दिव्य कुरआन - ५:११०)*

---

१. पाहा लूक २:२१

२. पाहा परिशिष्ट 'क' संदर्भासाठी पवित्र बायबलद्वारा शब्दाचे भाषांतर असून जॉन यांच्या विद्यमान गॉस्पलमध्ये त्याचा इंग्रजी अनुवाद 'Comforter' ग्रीक 'Parceletos' शब्दासाठी होय, त्याचा अतितार्थ 'Adovcate'.

३. पाहा परिशिष्ट 'क' संदर्भासाठी पवित्र बायबलद्वारा.

४. पाहा परिशिष्ट 'ड' संदर्भासाठी पवित्र पायबलद्वारा.

## येशू ईश्वराचा पुत्र नसून त्याची निर्मिती

कुरआनात म्हटले आहे, पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) म्हणतात, ते ईश्वराचे सुपूत्र कदापि नव्हते. परंतु पृथ्वीवरील प्रथम मानव ॲडमप्रमाणे त्याची निर्मिती होय. त्यांना पिता नव्हते. जसे ॲडम (आणि इव्ह सुद्धा) यांना वडील नव्हते. (तसेच मातादेखील नव्हती.)[१]

"अल्लाहजवळ ईसा (अ.) यांचे उदाहरण आदम (अ.) यांच्यासारखेच आहे की अल्लाहने त्यांना मातीपासून निर्माण केले आणि आज्ञा दिली की अस्तित्वात ये आणि त्यांचे अस्तित्व प्रत्यक्षात आले. ही वस्तूस्थिती आहे जी, तुमच्या पालनकर्त्याकडून सांगण्यात येत आहे आणि तुम्ही त्या लोकात सामील होऊ नका जे यांच्यात शंका घेतात.

"हे ज्ञान आल्यानंतर आता याबाबतीत तुमच्याशी जो कोणी वाद घालत असेल. तर हे पैगंबर, त्याला सांगा की, 'या, आमची मुलेबाळे व तुमची मुलेबाळे, आमच्या स्त्रिया, तुमच्या स्त्रिया तसेच तुम्ही आणि आम्ही, आपण सर्व येऊ या आणि अल्लाहजवळ सांगू या जो खोटा असेल त्याच्यावर अल्लाहचा प्रकोप आहे."

*(दिव्य कुरआन - ३:६१)*

(हे पैगंबर (स.)!) सांगा, "हे ग्रंथधारकांनो या एका अशा बाबीकडे जी आमच्या आणि तुमच्या दरम्यान समान आहे, हे की आपण अल्लाहशिवाय कोणाचीही मक्ती करू करू नये, त्याच्याबरोबर कोणासही भागीदार ठरवू नये, आणि आपल्यापैकी कोणीही अल्लाहशिवाय इतर कोणास आपला पालनकर्ता बनवू नये." या आवाहनाला स्वीकारण्यापासून ते जर पराङमुख झाले तर स्पष्ट सांगून टाका की साक्षी राहा आम्ही तर मुस्लिम (केवळ अल्लाहची भक्ती करणारे व त्याचे आज्ञापालन करणारे) आहोत.

*(दिव्य कुरआन - ३:६४)*

"तात्पर्य, जेव्हा (या उपकारांची आठवण करून दिल्यानंतर) अल्लाह फर्मीविल, 'हे मरयमपुत्र ईसा! काय तू लोकांना सांगितले होतेस की अल्लाहशिवाय मला आणि माझ्या मातेला देखील ईश्वर बनवा? तेव्हा तो उत्तरादाखल म्हणेल, पवित्र आहे अल्लाह!

१. पाहा परिशिष्ट 'क' संदर्भासाठी पवित्र बायबलद्वारा.

माझे हे काम नव्हते की ती गोष्ट सांगावी जी सांगण्याचा मला अधिकार नव्हता, जर मी तसे सांगितले असते तर अवश्य तुला माहीत झाले असते, तू जाणतो जे काही माझ्या मनात आहे, मी जाणत नाही जे काही तू जाणतोस. तू तर सर्व गुप्त हकीगतीचा ज्ञानी आहेस. मी त्यांना त्याशिवाय काहीच सांगितले नाही ज्याची मला तू आज्ञा दिली होती. ते हे की अल्लाहची भक्ती करा जो माझा पालनकर्ता आहे आणि तुमचा पालनकर्ता देखील. मी त्यावेळेपर्यंतच त्यांचा निरिक्षक होतो जोपर्यंत मी त्यांच्या दरम्यान होतो. जेव्हा तू मला परत बोलावून घेतलेस तेव्हा तूच त्यांचा निरिक्षक होतास आणि तू तर सर्वच गोष्टींचा निरिक्षक आहेस.'' *(दिव्य कुरआन - ५:११६-११७)*

''नि:संशय अश्रद्धा केली त्या लोकांनी ज्यांनी सांगितले की मरयमपुत्र मसिह हाच ईश्वर आहे. हे मुहम्मद (स.) त्यांना सांगा की जर अल्लाहने मरयमपुत्र मसिह आणि त्याची आई तसेच पृथ्वीवरील सर्वांना नष्ट करू इच्छिले तर कोण त्याला या इराद्यापासून रोखू शकेल? अल्लाह तर पृथ्वी आणि आकाशाचा आणि त्या सर्व वस्तूंचा स्वामी आहे ज्या पृथ्वी आणि आकाशामध्ये आढळतात. तो जे काही इच्छितो सृजन करतो व त्याचे प्रभुत्व प्रत्येक वस्तुवर आहे.'' *(दिव्य कुरआन - ५:१७)*

''लोक म्हणतात की, अल्लाहने एखाद्याला पुत्र बनविले आहे. पवित्र आहे अल्लाह! तो तर नि:स्पृह आहे, आकाशात व पृथ्वीवर जे काही आहे सर्व त्याच्या मालकीचे आहे. तुमच्या जवळ या कथनाचे काय बरे प्रमाण आहे. तुम्ही अल्लाहसंबंधी त्या गोष्टी सांगता काय! ज्याचे ज्ञान तुम्हाला नाही?'' *(दिव्य कुरआन -१०:६८)*

''त्यांचे म्हणणे आहे की अल्लाहला पुत्र ही आहे. अल्लाह तर या गोष्टीपासून कितीतरी पवित्र आहे. वास्तविक सत्य हे आहे की पृथ्वी आणि आकाशामधील सर्व गोष्टींचा स्वामी अल्लाह आहे. सर्वजण त्याचेच आज्ञाधारक आहेत. तोच आकाश आणि पृथ्वीचा प्रवर्तक आहे. जेव्हा एखादी घटना घडविण्याचे इच्छितो तेव्हा फक्त म्हणतो, 'तथास्तु' आणि क्षणार्धात तसे घडते.'' *(दिव्य कुरआन - २:११६-११७)*

''ते म्हणतात, रहमान संतती बाळगतो, अल्लाह पवित्र आहे. ते (म्हणजे दूत) तर दास आहेत. ज्यांना प्रतिष्ठा दिली गेली आहे.'' *(दिव्य कुरआन - २१:२६)*

''ते म्हणतात, परम दयाळूने एखाद्याला पुत्र बनविले आहे. अत्यंत वाह्यात

गोष्ट आहे जी तुम्ही घडवून आणली आहे. निकटच आहे की आकाशाने फाटावे, पृथ्वीने दुभंगावे आणि पर्वताने ढासळावे. या गोष्टींवर की लोकांनी परम दयाळूला अपत्य असल्याचा दावा केला. परमदयाळूचे वैभव असे नाही की त्याने एखाद्यास पुत्र बनवावे. पृथ्वी व आकाशात जे काही आहे सर्व त्याच्या ठायी दास म्हणून हजर होणार आहेत. (पुनरुत्थानाच्या दिवशी)'' *(दिव्य कुरआन - १९:८८-९३)*

''यहुदी म्हणतात की 'उजैर' अल्लाहचा पुत्र आहे. आणि ईसाई म्हणतात की मसीह (येशू) अल्लाहचा पुत्र आहे. या अवास्तव गोष्टी आहेत. ज्या ते आपल्या मुखातून काढतात. हे त्या लोकांचे अंधानुकरण आहे, जे त्यांच्यापूर्वी द्रोहामध्ये गुरफटले होते. अल्लाहचा प्रकोप. त्यांच्यावर कोठून हे बहकविले जात आहेत.''

*(दिव्य कुरआन - ९:३०)*

## येशू यांनी निरंकुश एकेश्वरत्व शिकवले

पवित्र कुरआन धर्मविषयक मूलभूत शिकवणीत तो एक असून पायाभूत आस्थेवर आधारित संपूर्ण आणि बहुव्यापक असल्याचे प्रतिपादन करतो. कुरआन अनेक स्थळी लोकांना आवाहन करतो की (जे एका श्रद्धेस अनेकात विभागणी) इस्लाम त्याचा स्वत:चा धर्म आहे. विशिष्ट संदर्भासह अध्याय ४३ मधील त्याच्या श्लोकात २६-२८ अरबच्या अनेकेश्वरवाद्यांना त्यांचे पूर्वज पैगंबर इब्राहीम (अ.) यांचा संदर्भ देत (इस्लामचा) धर्म म्हणून विचारार्थ श्लोकात (४३:४६) असेच आवाहन ज्यू लोकांना पैगंबर मूसा (अ.) यांच्या संदर्भाने तसेच ख्रिस्तजनांना सुद्धा श्लोक ५७-६५ मध्ये कुरआन येशूचा संदर्भ देत सांगितले,

''जेव्हा ईसा (अ.) स्पष्ट संकेत घेऊन आले तेव्हा ते म्हणाले होते की, 'मी तुमच्याजवळ विवेक घेऊन आलो आहे आणि अशा कारणास्तव आलेलो आहे की तुम्हावर त्या काही गोष्टींच्या हकीगतींचा उलगडा करावा, ज्यात तुम्ही मतभेद दर्शवित आहात. म्हणून तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञापालन करा. वस्तूस्थिती अशी आहे की अल्लाहच माझा पालनकर्ता आहे आणि तुमचा सुद्धा त्याचीच तुम्ही उपासना करा, हाच सरळ मार्ग आहे.'' *(दिव्य कुरआन - ४३:६३-६४)*

## ज्यू धर्मगुरू , मठवासी आणि येशू ईश्वर नाहीत

उपाध्येपणाची खरीखुरी कल्पना आगळीवेगळी आणि चिरस्थायी व्यवस्था शाश्वत्तपणे ईश्वर आणि मनुष्यादरम्यान उभी राहते आणि ईश्वरी मर्माचा चांगुलपणा व मोठेपणास कमीपणा आणणारी आहे. उपाध्ये व संतपूजा धर्मापासून गंभीर मार्गच्युती आहे. सर्व युगात चमत्कार धर्मभोळेपणाच्या कल्पनेस उत्तेजन देणारे ठरते.ज्यू लोकांचा वाढता धर्मभोळेपणा तलम्दमध्ये दाखविण्यात आला आहे. ख्रिस्तजनांच्या धर्मभोळेपणाची कल्पना पाप धर्मगुरूच्या अचूकपणाच्या शिकवणीशी निगडीत आहे. अनेक स्वामी आणि अनेक देवतांची आराधना (अमर्याद खोट्या देवांचा पूजक फक्त) आणि येशू यांना देवपण बहाल करण्याबाबत कुरआनने नापसंती दर्शविली आहे.

"यांनी आपल्या धर्मपंडिताना व जोगींना अल्लाह शिवाय आपला पालनकर्ता बनविले आहे. आणि अशा प्रकारे मरयम पुत्र मसिहला देखील. वास्तविक पाहता त्यांना एक उपास्याशिवाय इतर कोणाचीही भक्ती करण्याचा आदेश दिला गेला नव्हता. तो ज्याच्याशिवाय इतर कोणीही भक्तीचा अधिकारी नाही." *(दिव्य कुरआन - ९:३१)*

## येशू ईश्वराच्या सेवकाहून अधिक नाही

ज्या वेळी कुरआनने उघडपणे ईश्वराच्या एकमेवत्वाच्या नूतनीकरणाचे मत व्यक्त केले आणि ईश्वराच्या जागी अन्य बेगडी अराध्यास कठोरतेने प्रतिबंधित केले. या परिपेक्षात येशूचे उदारण ईश्वर आणि ईश्वराचा पुत्र म्हणून खोटेपणाने पूजेसाठी अरबच्या मूर्तीपूजकांपुढे सादर केले. त्यामुळे हेतुपुरस्सर त्यांचा गोंधळ उडाला आणि ते उपहास करीत हसू लागले. गोंगाट उत्पन्न करून निराधार भांडण उकरून ते मूर्तीपूजेचे समर्थन करू लागले.

"आणि ज्या क्षणी मरयमपुत्र ईसा (अ.) चे उदाहरण दिले गेले. तुमच्या लोकसमूहाने त्यावर हास्यकल्लोळ माजविला. आणि म्हणू लागले की आमचे उपास्य चांगले आहेत की तो? हे उदाहरण त्यांनी तुमच्यासमोर केवळ वितंडवादासाठी आणले आहे. वस्तूस्थिती अशी आहे की हे आहेतच बंडखोर लोक! मरयमपुत्र याशिवाय अन्य काहीच नव्हता की एक दास होता ज्याला आम्ही अनुग्रहित केले आणि बनी इस्त्राईलसाठी त्याला आमच्या सामर्थ्याचा एक नमूना बनविले."

*(दिव्य कुरआन - ४३:५७-५९)*

## पैगंबर येशू कुरआनच्या उजेडात

उपरोक्त वर्णनाव्यतिरिक्त काही सत्तर श्लोकांत सांगितल्याप्रमाणे पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) यांचा प्रत्यक्ष आणि अप्रत्यक्षरित्या पवित्र कुरआनच्या असंख्य श्लोकांत उल्लेख करण्यात आला आहे. त्यापैकी काही पुन:श्च उद्‌धृत करीत आहोत.

"जेव्हा ईसा (अ.) ला जाणवले की, बनी इस्त्राईल नाकारण्यासाठी तत्पर आहेत तेव्हा त्याने सांगितले, 'कोण अल्लाहच्या मार्गात माझा सहाय्यक बनेल? हवारींनी उत्तर दिले, आम्ही अल्लाहचे सहाय्यक आहोत! आम्ही अल्लाहवर श्रद्धा ठेवली, साक्षी राहा की आम्ही मुस्लिम (अल्लाहच्या आज्ञेपुढे नतमस्तक होणारे) आहोत. स्वामी! जे फर्मान तू अवतरले आहेस, आम्ही त्याला मानतो आणि पैगंबराचे अनुसरण स्वीकारतो. आमची नावे ग्वाही देणाऱ्यांमध्ये समाविष्ट कर." *(दिव्य कुरआन - ३:५२-५३)*

"नंतर बनी इस्त्राईल (येशू मसिहच्या विरुद्ध) गुप्त कारस्थान करू लागले. उत्तरादाखल अल्लाहने देखील आपला गुप्त डाव योजिला आणि असे डाव योजण्यात अल्लाह सर्वात वरचढ आहे." *(दिव्य कुरआन - ३:५४)*

"(ती अल्लाहची गुप्त युक्तीच होती) जेव्हा त्याने सांगितले की, 'हे ईसा (अ.) मी आता तुला परत घेईन आणि तुला माझ्याकडे उचलून घेईन व ज्यांनी तुला नाकारले आहे त्यांच्यापासून (म्हणजे त्यांच्या सहवासातून व घाणेरड्या वातावरणातील त्यांच्या संगतीत राहण्यापासून) तुला पवित्र करीन आणि तुझे अनुसरण करणाऱ्यांना पुनरुत्थानापर्यंत त्या लोकांवर वरचढ ठेवीन. ज्यांनी तुला नाकरले आहे. मग सरतेशेवटी तुम्हा सर्वांना माझ्याकडे यावयाचे आहे. तेव्हा मी त्या गोष्टींचा निर्णय देईन ज्यासंबंधी तुम्हा दरम्यान मतभेद निर्माण झाला आहे." *(दिव्य कुरआन - ३:५५)*

"बनी इस्त्राईलपैकी ज्या लोकांनी अश्रद्धेचा मार्ग अवलंबला ते दाऊद (अ.) आणि मरयमपुत्र येशू यांच्या वाणीद्वारे धिक्कारले गेले. कारण ते दुराचारी बनले होते व मर्यादा भंग करू लागले होते. त्यांनी एकमेकास दुष्कृत्यांपासून परावृत्त करण्याचे सोडून दिले होते." *(दिव्य कुरआन - ५:७८-७९)*

"मी जेव्हा हवारींना (येशूच्या अनुयायांना) इशारा केला की माझ्यावर व माझ्या पैगंबरांवर श्रद्धा ठेवा, तेव्हा त्यांनी सांगितले की, 'आम्ही श्रद्धा ठेवली आणि साक्षी

राहा की आम्ही मुस्लिम आहोत.' (हवारीसंबंधी) हा प्रसंगसुद्धा लक्षात ठेवावा की जेव्हा येशू ख्रिस्ताच्या अनुयायांनी सांगितले, 'हे मरयमपुत्र ईसा तुमचा पालनकर्ता आमच्यासाठी जेवणाचे एक (मोठे) ताट आकाशातून उतरवू शकेल? तेव्हा ईसा (अ.) याने सांगितले की अल्लाहच्या प्रकोपाचे भय बाळगा जर तुम्ही श्रद्धावंत असाल. त्यांनी सांगितले, आम्ही तर केवळ हेच इच्छितो की त्या ताटात जेवावे आणि आमची मने संतुष्ठ व्हावीत व अल्लाहला कळावे की आपण जे काही आम्हाला सांगितले आहे ते सत्य आहे व त्याचे आम्ही साक्षीदार व्हावे! जेव्हा मरयम पुत्र ईसाने प्रार्थना केली, 'हे अल्लाह, आमच्या पालनकर्त्या, आम्हावर आकाशातून एक ताट उतरव जे आमच्यासाठी व आमच्या अगोदरच्या आणि नंतरच्या लोकांसाठी आनंदाचा प्रसंग आणि तुझ्याकडून एक संकेत ठरावा. आम्हाला अन्न दे आणि तू सर्वोत्कृष्ठ उपजीविका देणारा आहेस.'' *(दिव्य कुरआन - ५:१११-११४)*

''त्याच्यानंतर आम्ही लागोपाठ आपले पैगंबर पाठविले. आणि त्या सर्वानंतर मरयमपुत्र ईसा (अ.) ला पाठविले. त्याला इंजिल प्रदान केले. ज्या लोकांनी त्याचे अनुयायित्व स्वीकारले त्याच्या हृदयात करूणा आणि दया उत्पन्न केली. वैराग्य त्यांनी स्वतःच काढले. आम्ही ते त्यांच्यासाठी कर्तव्य म्हणून ठरविले नव्हते. परंतु अल्लाहच्या प्रसन्नतेच्या शोधात त्यांनी स्वतःच ही कुप्रथा (बिदअत) काढली आणि मग त्यावर कायम राहण्याचे जे कर्तव्य होते ते त्यांनी पूर्ण केले नाही. त्यांच्यापैकी ज्या लोकांनी श्रद्धा ठेवली होती. त्याचा मोबदला आम्ही त्यांना प्रदान केला. परंतु त्यांच्यापैकी बहुतेकजण अवज्ञाकारी आहेत.'' *(दिव्य कुरआन - ५७:२७)*

''हे लोक हो, ज्यांनी श्रद्धा ठेवली आहे. अल्लाहचे सहाय्यक बना. ज्याप्रकारे मरयमपुत्र ईसाने हवारींना उद्देशून सांगितले होते. कोण आहे अल्लाहकडे (बोलविण्यात) माझा सहाय्यक आणि हवारींनी उत्तर दिले होते, 'आम्ही आहोत अल्लाहचे सहाय्यक! त्यावेळी बनी इस्त्राईलच्या एका गटाने श्रद्धा बाळगली आणि दुसऱ्या गटाने इन्कार केला. मग आम्ही श्रद्धावंतांचे त्यांच्याविरुद्ध समर्थन केले आणि तेच विजयी ठरले.'' *(दिव्य कुरआन - ६१:१४)*

# मेरी (तिला शांती लाभो)

## मेरीचा जन्म

मेरीच्या जन्मापूर्वी कुरआनच्या म्हणण्यानुसार तिची माता इमरानच्या पत्नीने बाळाला ईश्वराच्या सेवेत अर्पण करण्याची प्रतिज्ञा केली होती, अशी आख्यायिका त्या दिवसात प्रचलित होती.

"जेव्हा इमरानची पत्नी सांगत होती, 'हे माझ्या पालनकर्त्या! जे मूल माझ्या पोटात आहे, मी तुला अर्पण करते. ते तुझ्याच कार्याकरिता समर्पित असेल, ही माझी भेट स्वीकार कर. तू ऐकणारा व जाणणारा आहेस. मग जेव्हा ती मुलगी तिच्या पोटी जन्मास आली, तेव्हा तिने सांगितले, 'हे पालनकर्त्या! माझ्या पोटी तर मुलगी[१] जन्मली आहे. तिने कोणास जन्म दिला हे अल्लाहला ज्ञात होते. आणि मुलगा, मुलगी[२] सारखे असत नाही. बरे असो हिचे नाव 'मरयम' ठेविले आहे. आणि मी तिला आणि तिच्या भावी संततीला धिक्कारलेल्या सैतानाच्या उपद्रवापासून तुझ्या संरक्षणात देते." *(दिव्य कुरआन - ३:३५-३६)*

## विलक्षण उपजीविका

मेरी अल्लाहच्या विशेष सुरक्षितता आणि जकरिया (अ.) यांच्या देखरेखीखाली वाढली. तिची उपजीविका शारीरिक गरज त्याचप्रमाणे आध्यात्मिक भूक ईश्वराकडून परिपूर्ण होत राहिली.

"शेवटी तिच्या पालनकर्त्याने त्या मुलीला प्रसन्नतेने स्वीकार केला. तिचे निर्मळ व सुंदर खूप चांगली मुलगी म्हणून संगोपन केले. जकरिया (अ.) जेव्हा तिच्या जवळ महिरपमध्ये जात असे. तेव्हा तिच्याजवळ काहीना काही खाण्यापिण्याच्या वस्तू आढळत असत. तो विचारत असे, 'मरयम हे तुझ्याजवळ कोठून आले? ती उत्तर देत असे, अल्लाहकडून आले आहे. अल्लाह ज्याला इच्छितो त्याला अमर्याद देतो." *(दिव्य कुरआन - ३:३७)*

---

१. मेरी-नव्याने जन्मलेले मूल-अल्लाहच्या ज्ञानानुसार तिच्या स्त्रीत्वात सर्वसामान्य मुलगी नव्हती, अल्लाहच्या पैगंबराला जन्म देणारी होती.

२. पैगंबर मूसाकालीन कायद्याप्रमाणे स्त्रीलिंगी मूल ईश्वराच्या सेवेत समर्पित केले जाऊ शकत नव्हते.

## मेरीचे स्थान

जगातील समस्त स्त्रियांत आणि राष्ट्रात मेरी अद्वितीय एकुलती एक कोणत्याही पुरुषाच्या शारीरिक संपर्काशिवाय बाळाला जन्म देण्यासाठी अल्लाहकडून निवडलेली. तसेच निर्मळ चारित्र्य, शुद्धता व तिच्या निष्कलंकतेची काळजी घेण्यात आली होती.

“मग ती वेळ येऊन ठेपली जेव्हा ईशदूतांनी येऊन मरयमला सांगितले, ‘हे मरयम, अल्लाहने तुझी निवड केली, तुला पावित्र्य दिले आणि जगातील सर्व स्त्रियांवर तुला प्राधान्य देऊन आपल्या सेवेकरिता निवडली.”[१] *(दिव्य कुरआन - ३:४२)*

## ईशआज्ञा

मेरी-एक मानव प्राणी, एक निवडक स्त्री आणि ईश्वराच्या सेविकेहून अधिक काही नव्हती. कुरआनच्या प्रतिपादनानुसार ती देवाची माता कदापि नव्हती. यास्तव अल्लाहने तिला अन्य श्रद्धाळूप्रमाणे आपली आराधना करण्याची आज्ञा केली होती.

“हे मरयम आपल्या पालनकर्त्याची आज्ञाधारक बनून राहा. त्याच्यापुढे नतमस्तक होत राहा आणि जे ज्यास त्याच्या पुढे झुकणारे आहेत त्यांच्याबरोबर तूसुद्धा झुकत जा.” *(दिव्य कुरआन - ३:४३)*

## पैगंबर मुहम्मद (स.) आणि मेरी

ख्रिस्ती प्रक्षिप्त लिखाणात उल्लेख केल्याप्रमाणे धर्मगुरूंमध्ये संघर्ष निर्माण होऊन मेरीचा सांभाळ करण्यासाठी तिला कोणाच्या नियंत्रणात द्यावे. घटनेच्या तब्बल सात शतकांनंतर पैगंबर मुहम्मद (स.) यांना या भांडणाविषयी ज्ञात होऊ शकले नाही. शेवटी हा प्रकार कसा बाहेर आला. त्याचे कारण केवळ ईशअवतरण होते. त्याने घटनेचा तपशील त्यांना माहीत करून दिला. हे होते आणि आहे स्पष्ट करायला लावणारे. कारण ख्रिस्तजनांच्या श्रद्धेला पैगंबर मुहम्मद (स.) आणि अल्लाहचे अवतरण कुरआन यांच्यावर विश्वास ठेवण्यास भाग पाडणारे होय.

---

१. कुरआनचा ‘कलम’ (अर्थात लेखणी) अरबांचा निर्णायक भाग (एखाद्या निर्णयात अर्थाचा संदिग्धपणा किंवा मतभेद) बाणासह दर्शवितो. मेरीचा पालक कोण होऊ शकेल? हे ठरविण्यासाठी सोडत काढण्यात आली. जिची माता मंदिरात ईशसेवेत केंद्रित झाली होती. जकरियाच्या बाजूने निर्णय आला.

“हे पैगंबर (स.) या परोक्षाच्या वार्ता आहेत. ज्या आम्ही तुम्हाला दिव्य प्रकटनाद्वारे कळवित आहोत. एरवी तुम्ही त्यावेळी त्या ठिकाणी उपस्थित नव्हता. जेव्हा हैकलचे सेवक हा निर्णय घेण्याकरीता की मरयमचा पालक कोण असावा. यास्तव आपापले फासे फेकत होते आणि त्यावेळी देखील तुम्ही हजर नव्हता जेव्हा त्यांच्या दरम्यान भांडण सुरू होते.” *(दिव्य कुरआन - ३:४४)*

## आनंदी वार्ता

जेव्हा मेरीला बाळाची आनंदवार्ता देण्यात आली. ती आश्चर्यचकित झाली. कारण कोणत्याही मनुष्याने तिला स्पर्श केला नव्हता. तिला सर्वशक्तिमान अल्लाहकडून सांगण्यात आले की तो जे इच्छितो ते निर्माण करतो.

“आणि जेव्हा दूतांनी म्हटले, ‘हे मरयम, अल्लाह तुला एका आदेशाची शुभवार्ता देत आहे. त्याचे नाव मरयम पुत्र मसिह ईसा असेल व तो इहलोक आणि परलोकात प्रतिष्ठित राहील. अल्लाहच्या निकटवर्ती दासांमध्ये त्याची गणना होईल. तो लोकांशी पाळण्यात देखील संभाषण करील आणि मोठा होऊनसुद्धा आणि तो एक सदाचारी पुरुष असेल.’ हे ऐकून मरयम म्हणाली, ‘हे पालनकर्त्या, मला मूल कसे होणार? मला तर कोणा पुरुषाने स्पर्श देखील केला नाही.’ उत्तर मिळाले, असेच होईल अल्लाह जे इच्छितो ते निर्माण करतो. तो जेव्हा एखादे कार्य करण्याचा निर्णय घेतो तेव्हा फक्त म्हणतो की ‘हो’ तर ते होते.” *(दिव्य कुरआन - ३:४५-४७)*

## मेरी यांना दोष देणाऱ्यांचे नशीब

इस्लाम विशेषत: स्त्रियांच्या निष्कलंकतेसंबंधी चांगल्या नावलौकिकासाठी काळजी घेतो. कुरआनच्या अनुसार जर नारीची निंदा करणारे चार साक्षीदार उपस्थित करण्यास अयशस्वी ठरले तर त्यांना चाबकाचे ऐंशी फटके मारावेत आणि एखाद्या कायदेशीर भांडणात कार्यक्षम साक्षीमध्ये त्यांना प्रतिबंधित करण्यात यावे.

जे सोयिस्करपणे पवित्र ईशआज्ञाचे उल्लंघन करतात त्यांच्या हृदयावर ईशनिंदा केल्याबद्दल मोहोर लावली जाते. त्यांनी श्रद्धेची पायमल्ली करून मेरीवर खोटे आळ घेत गंभीर आरोप लावलेत की ती दोषी व कलंकित होती.

“सरतेशेवटी यांच्या प्रतिज्ञाभंग करण्यामुळे आणि या कारणास्तव की त्यांनी अल्लाहच्या वचनांना खोटे ठरविले, अनेक पैगंबरांना नाहक ठार केले आणि इथपर्यंत

सांगितले की आमची हृदये आवरणात सुरक्षित आहेत. वस्तुत: खरे पाहता यांच्या असत्यप्रियतेमुळे अल्लाहने यांची हृदये मोहरबंद केली आहेत. आणि यामुळेच हे फारच कमी श्रद्धा ठेवतात. मग आपल्या अश्रद्धेमध्ये हे इतके पुढे गेले की मरयमवर भयंकर आळ घेतला.'' *(दिव्य कुरआन - ४:१५५-१५६)*

## येशू केवळ ईश्वराचा एक शब्द मेरीकडे

''ईश्वराने मेरीच्या गर्भाशयास मानवी बिजाशिवाय गर्भयुक्त होण्याची आज्ञा दिली. प्रारंभिस ख्रिस्ती श्रद्धाळू अनुयायांना येशूच्या पितृहीन जन्माचे रहस्य सांगितले होते. परंतु संक्रमण काळात त्यांच्यात येशू (त्यानां शांती लाभो) यांच्या देवपणाबद्दलची असत्य शिकवण विकसित झाली. मात्र पवित्र कुरआनने याबाबत ग्रंथधारकांना ताकीद केली होती.

''हे ग्रंथधारकांनो, आपल्या धर्मात अतिरेक करू नका आणि अल्लाहशी सत्या व्यतिरिक्त इतर कोणतीही गोष्ट जोडू नका. मसिह मरयम पुत्र ईसा याशिवाय इतर काहीच नव्हता की अल्लाहचा पैगंबर होता. आणि एक आदेश होता की जो अल्लाहने मरयमकडे पाठविला आणि एक आत्मा होता अल्लाहकडून.'' *(दिव्य कुरआन - ४:१७१)*

## मेरीचे अलौकिक मातृत्व

जेव्हा देवदूताकडून मेरीला सांगण्यात आले होते की तिला पुत्र व्हावा म्हणून तिच्याजवळ मानवी वेषात कोण उपस्थित झाला होता. ती तिच्या निष्कलंतेच्या कारणामुळे विश्वास करू शकली नाही. कुरआनने संपूर्ण वस्तूस्थिती कथन केली. मेरीला बाळाची गर्भधारणा झाली. त्याचा विस्मयचकित करणारा जन्म आणि त्याबाबत जनआक्षेप, पाळण्यात बोलण्याचा चमत्कार, तसेच ईश्वराचा गुलाम-सेवक म्हणून आपणाला जाहीर करणे, स्वत:ला पैगंबराच्या नात्याने ईश्वराकडून अवतरणाऱ्या सत्य घटनेचे प्रतिपादन (अनभिज्ञ लोकांना अधिकाराने सांगणे) ईश्वराच्या स्तुतीस व दर्जास केव्हा खात्रीने योग्य नसल्याचे होय.

आणि हे पैगंबर (स.) या ग्रंथात मरयमचा वृत्तान्त वर्णन करा जेव्हा ती आपल्या लोकांपासून अलिप्त होऊन पूर्व [१] दिशेस एकांतवासीनी झाली होती. आडपडदा करून ती त्यांच्यापासून स्वत: [२] लपून बसली होती. या स्थितीत आम्ही

१. ती भक्ती व प्रार्थनेसाठी बैतुल लहमच्या पूर्वेकडील भागात एकान्तमध्ये गेली.

२. म्हणजे ती एकान्तात प्रार्थनेमध्ये एकाग्रता स्त्री-पुरुष परस्पर क्रियाविरुद्ध गेली. शुद्धता व निष्कलंकतेच्या स्थितीत ईशदूत तिच्याकडे आला.

तिच्याजवळ आपल्या आत्म्यास [1] (म्हणजे दूतास) पाठविले आणि तो तिच्यासमोर एक पूर्ण मानवाच्या रूपात प्रकट झाला. मरयम अकस्मात उद्‌गारली, 'जर तू एखादा ईशपरायण मनुष्य आहेस तर मी परम दयाळू ईश्वराचा आश्रय मागते तुझ्यापासून.' तिने सांगितले, 'माझ्याठायी मुलगा कसा होईल? जर मला कोणत्याही पुरुषाने स्पर्श देखील केलेला नाही. आणि मी काही व्यभिचारिणी नाही.' दूताने सांगितले, 'असेच घडेल.' तुझ्या पालनकर्त्याने सांगितले की असे करणे माझ्यासाठी फार सोपे आहे. आणि असे यासाठी करू की त्या मुलाला लोकांसाठी एक संकेत बनवावे आणि आपल्याकडून एक कृपा आणि हे कार्य होणारच आहे.''

मरयमने त्या मुलाचा गर्भ धारण केला आणि तो गर्भ घेऊन एका दूरवरच्या ठिकाणी गेली. मग प्रसूतीवेदनेने तिला एका खजुरीच्या झाडाखाली पोहचविले. ती म्हणू लागली, 'मी यापूर्वीच मेले असते आणि माझा थांगपत्ताही लागला नसता.' दूताने चरणाकडून हाक मारून तिला सांगितले, ''दुःख करू नकोस, तुझ्या पालनकर्त्याने तुझ्याखाली एक झरा प्रवाहीत केला आहे आणि तू थोडे या झाडाच्या खोडाला हलव, तुझ्यावर ताज्या, रसाळ खजुरी पडतील. त्या तू खा आणि पाणी पी. आपले डोळे बंद कर, मग जर तुला एखादा मनुष्य दृष्टीस पडला तर त्याला सांग की मी परम दयाळूसाठी उपवासाचे व्रत केले आहे. म्हणून मी आज कोणाशीही बोलणार नाही.''

''मग ती आपल्या मुलाला घेऊन आपल्या लोकात आली. लोक म्हणू लागले, 'मरयम, हे तर तू मोठे पाप केलेस. हे हारूनच्या भगिनी. तुझा बापही काही वाईट मनुष्य नव्हता. आणि तुझी आई देखील काही व्यभिचारिणी नव्हती.' मरयमने मुलाकडे इशारा केला. लोकांनी सांगितले, 'आम्ही याच्याशी काय बोलावे? जे पाळण्यात असलेले एक मूल आहे' मूल उद्‌गारले. मी अल्लाहचा दास आहे. त्याने मला ग्रंथ दिला आणि पैगंबर बनविले तसेच समृद्धशाली बनविले. जेथे कोठे मी असेन नमाज व जकात सुनियमित करण्याची आज्ञा दिली. जोपर्यंत मी जिवंत असेन आणि आपल्या आईसंबंधी कर्तव्यपालन करणारा बनविले.'' *(दिव्य कुरआन -१९:२७-३२)*

ईश्वराच्या अनंत शक्तीने कोणत्याही माणसाच्या जीवित देहात (मानवी किंवा अमानवी) नेहमीच्या प्रमाणाविरुद्ध आणि स्पष्ट अशा शारीरिक नियमाविरुद्ध येशूचा कुमारिका मातेच्या उदरातील जन्म एक चमत्कार होता.

---

१. यद्यपि स्पष्टपणे एक मानव तिच्या एकांतात आला होता. परंतु ईश्वर दाखला देतो की तो खरोखर आत्मा होता. म्हणजे ईशदूत ज्याला ईश्वर पवित्र आत्मा म्हणतो.

"आणि मरयम पुत्राला व त्याच्या आईस आम्ही एक संकेत बनविले आणि त्यांना एका पठारावर ठेवले जी समाधानाची जागा होती आणि त्यात झरे वाहत होते."

*(दिव्य कुरआन - २३:५०)*

येशूंच्या जन्मातून हे सूचित होत नाही की ईश्वर त्यांचे पिता होते. पिता या अर्थाने ग्रीक दंतकथेमध्ये लॅटोनाद्वारे Zenus अपोलोचे पिता होते.[१] अथवा Europa कडून Minous. जसा देवाच्या आत्म्याच्या प्रयोगाचा संबंध जो कुरआनच्या अनुसार मरयमच्या शरीरात श्वासोश्वास घेत होता. हे कदापि सूचित करीत नाही की ईश्वर येशूचे पिता होते. पवित्र कुरआनातील (३२:९)[२] आणि विशेषत्वाने आदमविषयी ईशआत्म्याचा श्वासोश्वास प्रत्येक मानवी बालकाच्या निर्मितीच्या टप्प्यात असतो. कुरआनचे (अध्याय १५ श्लोक २९)[३] ठाम प्रतिपादन आहे की मेरी शुद्ध आणि निष्कलंक होती.

"आणि इमरानची मुलगी मरयम चे उदाहरण देतो जिने आपल्या शीलाचे रक्षण केले होते. मग आम्ही तिच्यात आपल्याकडून आत्मा फुंकला आणि तिने आपल्या पालनकर्त्याच्या वचनाची व त्याच्या ग्रंथाची सत्यता प्रमाणित केली आणि ती आज्ञाधारक लोकांपैकी होती."

*(दिव्य कुरआन - ६६:१२)*

सारांश कुरआनच्या ९३ श्लोकांपैकी उपरोक्तप्रमाणे दर्शविले आहे -

अ) येशूची माता 'मेरी' एक उच्च व गौरवशाली स्थान असलेली स्त्री होती.

ब) पित्याशिवाय बाळाला जन्म देणारी 'मेरी' शुद्ध आणि निष्कलंक होती. ज्यू लोकांकडून तिच्यावर पाप केल्याबद्दल लावण्यात आलेल्या निष्कारण आरोपाचे कुरआन खंडन करतो.

क) ईश्वराच्या सर्वशक्तीमत्वाने मानवी पित्याशिवाय मानवी जिवाची निर्मिती होऊ शकते. जसे पालकाव्यतिरिक्त 'ॲडम' आणि 'इव्ह'चीसुद्धा मातापित्याशिवाय निर्मिती झाली.

ड) अशा प्रकारे येशूला ईश्वराचा पुत्र संबोधणे बायबलच्या लाक्षणिक अर्थाऐवजी शब्दशः पुत्र म्हणणे असत्य आहे.

- समाप्त -

---

१. पाहा परिशिष्ट 'ड'

२. नंतर त्याने त्याचे प्रमाण बनविले अर्थात मनुष्य त्याच्यात त्याच्या आत्म्याद्वारे श्वास घेतला.

३. जेव्हा मी त्याला पूर्ण आकार दिला (म्हणजे आदम) आपल्या आत्म्याद्वारे त्याच्यात श्वास घेतला.

# परिशिष्ट 'अ'

## येशू (त्यांना शांती लाभो) यांचे देवत्व आणि अन्य कोणत्याही मनुष्यांविषयी बायबलचे प्रतिपादन

'ट्रिनिटी' अर्थात पिता, पुत्र आणि पवित्र आत्म्याचा मिलाप असलेल्या ईशमार्गाच्या ध्वन्यर्थाचा विचार मूर्खपणाचा नाही. येशू (त्यांना शांती लाभो) ईश्वर असण्यासंबंधी बायबल काही निक्षून व खात्रीपूर्वक प्रतिपादन करतो. ईश्वर अवतार, शाश्वत, पवित्र ईश्वरी आदी. चला, आपण स्वत: पवित्र बायबलच्या श्लोकांचे वाचन करू या.

"आणि येशू त्याला उत्तरला, सर्वप्रथम ईशआज्ञा आहेत. ऐका, अहो इस्त्राईल, स्वामी आमचा ईश्वर एक ईश्वर आहे." (मार्क - १२ : २९)

"यास्तव ईश्वर एक आहे आणि एक मध्यस्त.[१] ईश्वर आणि मनुष्याच्या दरम्यान मनुष्य येशू ख्रिस्त." (टिमोथी - २ : ५)

"माझ्यापूर्वी तुमचा अन्य ईश्वर राहिला नाही." (इक्सोडस - २० : ३)

"म्हणून तुम्ही दुसऱ्या ईश्वराची उपासना करू नका. स्वामीकरिता ज्याचे नाव हेवा करणारे. हेवा करणारा ईश्वर." (इक्सोडस - ३४ : १४)

"ऐका, अहो इस्त्राईल! स्वामी आमचा ईश्वर एक स्वामी आहे."
(ड्यू ट्रोनामी - ६ : ४)

"त्यांनी काय बघितले किंवा ऐकले? त्याकडून ईश्वर नव्हता. हा केवळ येशू होता. ईश्वराने त्याला पाठविले होते. (म्हणजे संदेशवाहक आणि पैगंबर) त्याला शपथेवर सांगितले." (जॉन - ५ : ३७)

"येशू यांना सैतानाकडून चाळीस दिवसांची भुरळ घालण्यात आली."
(लूक - ४ : ४-१३)

"ईश्वराला कोणी दुष्टपणे भुरळ घालू शकत नाही." (जेम्स - १ : १३)

ईश्वर आणि येशू बायबलमधील लाक्षणिक अर्थाने 'पिता आणि पुत्र'... दोन भिन्न वस्तू, दोन वेगवेगळ्या दर्जातून. "माझा पिता माझ्यापेक्षा महान आहे."
(जॉन - १४ : २८)

१. मध्यस्त म्हणजे रसूल (पैगंबर) कुरआनच्या परिभाषेत.

"मी स्वत:हून काही करीत नाही." (जॉन - ८ : २८)

"पिता, तुमच्या हातामध्ये मी आत्म्याची आज्ञा पाळतो."(लूक - २३ : ४६)

"वधस्तंभाजवळ येशू ओरडला, 'माझ्या ईश्वरा! माझ्या ईश्वरा! मला सोडून का दिलेस तू?"[१] (मार्क - १५ : ३४)

"ईश्वर असा आहे. ज्याला मनुष्याने पाहिले नाही आणि कधी पाहू शकत नाही. (ज्या अर्थी लोकांनी पाहिले होते आणि येशूला पाहू शकत होते.)" (टिमोथी - ६ : १६)

"यास्तव मूर्त्यांना अर्पण करण्यात आलेल्या खाद्यपदार्थांशी संबंधित आम्ही जाणतो. जगात मूर्त्या नाहीत आणि एकेश्वराशिवाय अन्य ईश्वर नाही."[२] (कोरिंथिअन्स - ८ : ४)

"ते सूर्योदयापासून जाणून घेऊ शकता त्याच्या अस्तापर्यंत माझ्याशिवाय कोणीच नाही. मी स्वामी आणि अन्य दुसरा कोणी नाही." (आयझाया - ४५ : ६)

"मजकडे पाहा आणि सुरक्षित व्हा. तुम्ही सर्व पृथ्वीच्या अंतापर्यंत म्हणून मी आहे. ईश्वर आणि अन्य दुसरा नाही." (आयझाया - ४५ : २२)

"अशा तऱ्हेने स्वामीने सांगितले, ज्याने स्वर्गाची निर्मिती केली. ईश्वर कोण आहे? ज्याने वसुंधरा स्थापित आणि तयार केली. ज्याने तिला प्रस्थापित केले. त्याने व्यर्थ म्हणून ते निर्माण केले नाही. त्याने राहण्यासाठी ते बनविले. मी आहे स्वामी अन्य दुसरा कोणी नाही." (आयझाया - ४५ : १८)

"अशा प्रकारे स्वामी उद्गारतो, मी सर्वप्रथम आणि अंतिम आहे. माझ्या व्यतिरिक्त कोणी ईश्वर नाही." (आयझाया - ४४ : ६)

"तुम्ही माझे साक्षीदार आहात' स्वामी म्हणतो आणि माझे सेवक.[३] मी ज्यांना निवडले आहे. तुम्ही हे जाणा आणि मजवर विश्वास ठेवा तसेच लक्षात घ्या! तो मी आहे! माझ्यापूर्वी ईश्वर निर्माण झाला नव्हता अन माझ्यानंतर सुद्धा तो नसणार!" (आयझाया - ६ - ४३ : १०)

---

१. हिब्रमध्ये 'Eloi, Eloi, la'ma Sabachthani?'

२. अरबीमध्ये (कुरआनातील) शब्द 'La-llaah illa-Allah' किंवा 'La - llaah illa huwa.'

३. 'सर्व्हन्ट' शब्दाचा प्रयोग अरबीमध्ये (कुरआनातील) पैगंबरासाठी आहे. 'अब्द'... अर्थ सेवक, गुलाम. कुरआन 'अब्द' शब्दाचा उपयोग त्याचे समस्त मानव प्राणी, मग ते सामान्यजन किंवा पैगंबर... येशू आणि मुहम्मद (दोहोंना शांती लाभो) सह.

"मी जरी स्वामी आहे आणि माझ्याशिवाय कोणी तारक नाही. मी जाहीर आणि सुरक्षित केले. मी उघड केले आहे. तसेच परकीय ईश्वर आमच्या दरम्यान नाही. म्हणून तुम्ही माझे साक्षीदार आहात. स्वामी म्हणतो, मी ईश्वर आहे!"[१]

(आयझाया - ४३ : १०-१२)

"ईश्वरामध्ये तुमचासारखा कोणी नाही. अहो स्वामी, एखादे कार्य तुमच्या कार्यासारखे नाही!" (साम - ८६ : ८)

"स्वामीशी कुणाबरोबर तुलना केली जाऊ शकते स्वर्गात? स्वामीसारखा सामर्थ्यवान कोण सुपुत्र आहे?"[२] (साम - ८९ : ६)

"स्वामी सर्व राष्ट्रापेक्षा उच्च, त्याचे वैभय स्वर्गापेक्षा श्रेष्ठ. कोण आहे स्वामीसारखा आमच्या ईश्वरासमान? जो उंचावर निवास करतो!"

(साम - ११३ : ४,५)

"मग तो म्हणाला, 'उद्या' आणि तो वदला, तुझ्या शब्दानुसार होऊ दे. तुम्ही जाणता की एकाशिवाय दुसरा कोणी स्वामी आपला ईश्वर नाही."(इक्सोडस - ८ : १०)

"तुम्हाला हे दाखविले होते की तुम्ही जाणता स्वामी स्वत: ईश्वर आहे. त्याच्याऐवजी दुसरा नाही." (ड्यूट्रोनॉमी - ४ : ३५)

"म्हणून आपण महान आहात. हे स्वामी ईश्वरा! कारण माझ्यासारखा कुणीच नाही. माझ्याशिवाय अन्य ईश्वर नाही. अशा प्रकारे या सर्वांवरून आम्ही कानांनी ऐकले." (सम्युअल - ७ : २२)

"इस्त्राईलच्या स्वामी ईश्वरा! वर आकाशात ईश्वर नाही किंवा पृथ्वीवर खाली तुमच्यासारखा जो आपल्या दासांबरोबर करूणा बाळगतो. जे तुमच्या पुढ्यात आपल्या हृदयासह चालतात." (I किंग - ८ : २३)

"अहो स्वामी! तुमच्यासमान कोणीही नाही. तुमच्याव्यतिरिक्त अन्य ईश्वर नाही. अशा तऱ्हेने आम्ही आपल्या कानांसह सर्व श्रवण केले."

(I क्रोनिकल - १७ ते २०)

---

१. ईश्वर/गॉड्स शब्दाचा उपयोग बायबलमध्ये अनेक पैगंबरांसाठी सुद्धा. पाहा जवळच्या परिशिष्टात लगेच आलेल्या ओळी.

२. सन्स.. सारे मानव पैगंबरांसह लाक्षणिक अर्थाने पाहा परिशिष्ट डी.

''अद्याप मी स्वामी आहे, तुमचा ईश्वर इजिप्तच्या भूमिपर्यंत आला तुम्ही पाहाल मजशिवाय कोणी ईश्वर नाही. माझ्याव्यतिरिक्त कोणी संरक्षक नाही.''

(होसिया - १३ : ४)

''आणि स्वामी संपूर्ण वसुंधरेवर राजा होईल त्या दिवशी हे घडेल. स्वामी एकमात्र आणि त्याचे नामाभिधान एक होय!'' (जकरिया - १४ : ९)

## 'ईश्वर' शब्दाचा प्रयोगसुद्धा पैगंबरासाठी

'ईश्वर' या शब्दाचा उपयोग बायबलमध्ये (OT आणि NT दोहोत) पैगंबरांसह अन्य लोकांकरिता आणि सैतानासाठी देखील झाला आहे. यावरून हे सिद्ध होते की येशू ख्रिस्त (त्यांना शांती लाभो) यांच्यासाठी धर्मग्रंथामध्ये झालेला ईश्वर शब्दाचा प्रयोग त्यांना ईश्वर ठरवित नाही.

''म्हणून स्वामी मूसाला म्हणाला, पाहा मी तुम्हाला फिरऔनसाठी ईश्वरासमान बनविले आणि तुमचा बंधु हारून तुमचा पैगंबर होईल.'' (इक्सोडस - ७ : १)

''ईश्वर प्रचंड धार्मिक सभेत उभे राहून ईश्वरांदरम्यान तो न्याय देईल.''

(साम - ८२ : १)

''मी म्हणालो, तुम्ही ईश्वर आहात. तुम्ही सगळे अतिशय उच्च ईश्वराचे बालक आहात.''

(साम - ८२ : ६)

''ज्यांची मने विद्यमान युगातील ईश्वराने (सैतान) दृष्टीहीन बनविली. जे विश्वास बाळगत नाहीत, येशूच्या वैभवाचा प्रकाश येऊ दे. जी ईशकल्पना आहे त्यांच्यावर प्रकाशमान होऊ दे.'' (II कोरिंथिअन्स - ४ : ४)

# परिशिष्ट 'ब'

## ट्रिनिटीचा इतिहास

'Triune God' एक नवीन प्रकारचा सिद्धान्त नसून हा पुष्कळ अंशी अलीकडील ख्रिस्ती क्षेत्रातील अन्य श्रद्धा, धर्म आणि प्रत्यक्ष ईशज्ञानातील प्रघात आहे. तो असा,

१. हिन्दु त्रिकुटात ब्रह्मा, विष्णू आणि शिव.

२. बुद्धांच्या महायानात देहात रूपांतर शरीर, सुख शरीर, सत्य शरीर.

३. इजिप्तशीयन त्रिकुटात होरास, ओसिरिस आणि ईसीस.

४. पल्मायरा त्रिकुटात चंद्रईश्वर, सूर्य ईश्वर आणि स्वर्गाचा ईश्वर.

५. बेबीलोनियन त्रिकुटात ईश्वर, सीन आणि शम्स.

६. इजिप्तशियन त्रिकुटात रासेस, अमोन - २१ आणि नट.

हा त्रिईश्वरीय सिद्धान्त (१ ईश्वर + १ ईश्वर + १ ईश्वर = १ ईश्वर) ख्रिस्तेतर अन्य लोकांच्या श्रद्धेशी संबंधित अलीकडील ख्रिस्त शतकात सर्व बाजूपर्यंत आहे. परंतु आता त्रिईश्वरवादाने बहुतकरून सोळा शतकांकरिता महत्त्वपूर्ण मूलभूत ख्रिस्ती श्रद्धेचे स्थान ग्रहण केले आहे. त्यांचा उगम, प्रगती आणि सिद्धान्ताचा अधिकृतपणे अभ्यास होणे गरजेचे आहे.

ट्रिनिटीची शब्दावली सर्वप्रथम टेर्टूलियन (१५५-२२० इ. सन) या विधिज्ञ आणि कार्थेज चर्चचे सभासद यांनी तिसऱ्या शताब्दीत शोधून काढली. त्यांनी सिद्धान्त मांडला की पुत्र आणि आत्म्याचा सहभाग ईश्वरात आहे. परंतु तात्पर्य, सर्वकाही पित्यासह एक आहेत. (इण्टरप्रिटर्स डिक्शनरी ऑफ बायबल, खंड ४, पान ७११)

## ट्रिनिटीचा सिद्धान्त

येशू, जॉन, मॅथ्थीव, लूक, मार्क सगळे धर्मप्रचारक आणि पॉलसुद्धा कोणत्याही ट्रिनिटीविषयी संपूर्णतः अनभिज्ञ होते. एडिनबर्ग विद्यापीठाचे वरिष्ठ अधिण्याख्याते डेव्हीड एफ. राईट ट्रिनिटीच्या सिद्धान्ताच्या विकासाबद्दल त्यांचा ग्रंथ 'Eerdman's Handbook to the History of Christianity' मधील 'Councils and

Creeds' या प्रकरणात नमूद करतात की Baucalis येथील चर्चचे कार्यवाहक ज्येष्ठ पॅरिश सदस्य ॲरिअस यांनी ३१८ इ. सनामध्ये त्यांचे बिशप अलेक्झांडर यांच्याशी उद्‌भवलेल्या संघर्षप्रसंगी येशू (त्यांना शांती लाभो) यांच्या कोणत्याही देवत्वाचे खंडन केले होते.

याचवेळी दोन वेगवेगळ्या घटना रोमन सम्राटांच्या अधिकृत मान्यताप्राप्त चर्चकडून घडल्या होत्या. एका बाजूस मूर्तिपूजक रोमन सम्राट कॉन्सटाईन यांनी त्यांच्याशी निगडीत संपूर्ण साम्राज्याच्या अंतर्गत स्थैर्यासाठी नूतन श्रद्धेकडे आकर्षित होणाऱ्या नवीन धर्मांतरितांचा ओढा गंभीर इशारा समजून त्याकडे लक्ष देण्यास प्रारंभ केला.

उपरनिर्दिष्ट माहितीप्रमाणे अलेक्झांड्रीयाच्या ॲरिअस डिकन (चर्च व्यवस्थापक) आणि अलेक्झांडर बिशप या दोन ख्रिस्ती आघाडीच्या चर्च मंडळी दरम्यान इ.स. ३१८ मध्ये मतभेद निर्माण झालेत. सम्राट कॉन्सटाईनचे त्यांना शांत करण्याचे काही प्रयत्न अयशस्वी ठरलेत. इ.स. ३२५ मध्ये जोरदार पराकाष्ठेनंतर त्याने कौन्सिल ऑफ नायसियाची बैठक बोलावली.

कौन्सिल ऑफ नायसियाची मिटींग होऊन येशू (त्यांना शांती लाभो) ईश्वर होते किंवा नाही. यावर मतदान घेण्यात आले. त्यांनी प्रभावीपणे येशू (त्यांना शांती लाभो) ईश्वर असल्याबाबत मतदान केले. एन्सायक्लोपीडिया ऑफ रिलीजन इथिक्स चॅप्टर 'ॲरिअस'च्या संदर्भान्वये प्रशस्त पुरावा मिळाला की त्यापैकी अनेकजण ज्यांनी करारावर स्वाक्षऱ्या केल्या होत्या, त्यांना वास्तविकपणे त्यावर विश्वास नव्हता. परंतु राजकीय प्रयुक्तीचा विचार करून तसे केले. प्रचंड बहुसंख्येने राजनैतिक दबावाखालि सह्या करण्यात आल्या. उपस्थितांपैकी फक्त ३१८ जणांनी तत्परतेने कराराचा स्वीकार केला. घरी प्रस्थान करताना निकोडो याच्या इझिबुयजसारखे लोक, चॅलेडॉनचे मरिस आणि मायझियन दिओगजिस यांनी एकत्रित येऊन सम्राट कॉन्सटाईन यांना लिहिण्याचे धाडस दाखविले की त्यांनी नायसियाच्या करारावर स्वाक्षऱ्या केल्याबद्दल पश्चात्ताप व्यक्त केला. निकोडो याचे इझिबुयज हा लिहितो,

"आम्ही अधार्मिक कृत्यासाठी अनिष्ठ काम केले. अहो राजपुत्र, केवळ आपल्या भीतीमुळे ईश्वरनिंदेस मान्यता प्रदान केली.

ट्रिनिटी अर्थात व्यक्तीत्रयात्मक ईश्वरत्वाच्या शिकवणीचे सूत्रीकरण.

'कौन्सिल ऑफ नायसिया'च्या करारानंतर ख्रिस्ती एकेश्वरत्वाचे एका ईश्वरात तीन ईश्वरांच्या अनेकेश्वरत्वात परिवर्तन झाले. हे कृत्य खोट्या देवाचा पूजक रोमन सम्राट कॉन्सटाईन यांच्या लहरीनुसार उचित होते. त्याच्या साम्राज्याचे सामर्थ्य व स्थैर्यासाठी त्याच्या कार्यनिष्पत्तीस चर्चचीसुद्धा अधिकृत मान्यता लाभली. आता पुढील काम ट्रिनिटीच्या तत्त्वाच्या सूत्रीकरणाचे होते.

'एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका'नुसार ही शिकवण खालील व्यक्तींकडून सुसूत्रित करण्यात आली होती.

१. अथेन्गोरस (एन्सायक्लो. ब्रिटा. १ : ६६७ : २ बी)

२. बझील द ग्रेट (एन्सायक्लो. ब्रिटा. १ : ९३८ : १ ए)

३. ग्रेगरी ऑफ नायझिअन्स (एन्सायक्लो. ब्रिटा. ५ : ४८२ : १ बी)

४. ग्रेगरी ऑफ नायसा (एन्सायक्लो. ब्रिटा. ५ : ४८३ : २ बी)

५. कॅपेडोसिअन फादर्स (एन्सायक्लो. ब्रिटा. १६ : ३१९ : १ बी)

Early Christaian Doctrines च्या अनुसार J.N.D. Kelly, Happer and Row Publications, U.S.A. १९६०, पान २५२.

'व्यक्तित्रयात्मक देव' या तत्त्वाचे सूत्रीकरणासाठी मुख्यतः उत्तरदायी व्यक्ती होत्या,

ईस्टर्न चर्चमध्ये : कॅपेडोसिअन फादर्स

१. बझील द ग्रेट (३२९ - ३७०)

२. ग्रेगरी ऑफ नायझिअन्स (३२९ - ३९१)

३. बझीलचे युवा बंधु ग्रेगरी ऑफ नायसा (३३५ - ३९५)

वेस्टर्न चर्चमध्ये : १ अगस्टीन ऑफ हिप्पो (४३० डी)

## ट्रिनिटी आणि त्याची शिकवण नव्या करारात नाही

ख्रिस्ती धर्मश्रद्धेत पिता, पुत्र आणि पवित्र आत्म्याचे ऐक्य जणू तीन व्यक्तींमध्ये एक ईश्वरत्व व्यक्तित्रयात्मक देव आणि स्पष्ट शिकवण दोहोंपैकी एकाचाही बायबलच्या नवीन करारात अंतर्भाव दिसून येत नाही. The Council of Nicaes ने ३२५ मध्ये ठराविक निर्णायक शिकवणीच्या सूत्रात त्याच्या अपराधाच्या कबुलीजबाबात पिता म्हणून पुत्र तात्पर्य आहे. तेसुद्धा पवित्र आत्म्याबद्दल अत्यल्प म्हटले आहे. आगामी अर्धशतकानंतर अथेंसिअस यांनी नायसिया सूत्राचे समर्थन व शुद्धीकरण केले आणि नायझिअन्सचे ग्रेगरी (कॅपेडोसिअन फादर्स) यांच्या नेतृत्वाखाली ट्रिनिटीच्या तत्त्वाचे स्वरूप नेहमीसाठी वस्तूत: आजपर्यंत सुरू ठेवण्यात आले आहे.

(एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका, अण्डर हेडींग ट्रिनिटी)

## ट्रिनिटी : तीन शतकांच्या सैद्धान्तिक विकासाची उत्पत्ती

विसाव्या शतकाच्या दुसऱ्या अर्ध्यात एक स्पष्ट वस्तूनिष्ठ आणि प्रामाणिक आविष्कारणासंबंधी सैद्धान्तिक मूल्यमापन व ईशज्ञानाचा अभ्यास ट्रिनिटीच्या रहस्यमय बाबींची सुधारणा कठीण आहे. त्रिईश्वरत्व चर्चा रोमन कॅथोलिक त्याचप्रमाणे अन्य काहीशी अस्थिर छायाकृती सादर करतात. तिकडे उराशी बाळगणारी-काळजी आणि बायबलच्या ब्रह्मज्ञानासह सातत्याने वृद्धिंगत होणारी रोमन कॅथॉलिक संख्या गंभीर पात्रतेशिवाय कोणी एक त्रिईश्वरत्वावर नवीन करारात बोलू शकत नाही. तिथेदेखील समांतर मान्यता आहे. ऐतिहासिक ठराविक तत्त्व आणि पद्धतशीर धर्म आणि ईश्वर यांचा अभ्यास जेव्हा त्रिईश्वरत्वावर एकजण बोलू शकतो. ख्रिस्त उगम काळापासून चौथ्या शतकाच्या एक चतुर्थांश भागापर्यंत त्यांच्या जीवनात व्यक्ती त्रयात्मक देव सिद्धान्ताचा संचार झाला. यासाठी तीन शतकांचा कालावधी लागला.

न्यू कॅथोलिक एन्सायक्लोपीडिया, खंड २४, पान २९५

# परिशिष्ट 'क'

## चमत्कार आणि देवपण

"मी स्वत: काही करू शकत नाही. जसे मी ऐकतो मी न्याय करतो आणि माझा निवाडा योग्य आहे. कारण मी स्वत:च्या इच्छेचा शोध घेत नाही. परंतु पित्याच्या इच्छेचा ज्याने मला पाठविले. जर मी स्वसाक्षीस सहन करतो. माझी साक्ष सत्य नाही. तो दुसरा आहे जो माझ्या साक्षीला सहन करतो. आणि मला ज्ञात आहे तो माझा खरा साक्षीदार आहे." येशू (जॉन - ५ : ३०, ३२)

चमत्कार दाखविणे माणसाला ईश्वर बनवत नाही. येशू (त्यांना शांती लाभो) व्यतिरिक्त अन्य पैगंबर आणि पवित्र मनुष्यांनी सुद्धा सर्वशक्तिमान ईशकृपने ते केले आहे. हे सिद्ध करीत नाही की ते देवत्वाचा दर्जा बाळगतात. पवित्र बायबलने अशा चमत्कारांची साक्ष दिली आहे.

कुष्ठरोग निवारणाचा चमत्कार : पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) कुष्ठरोग बरा करू शकले. परंतु इलिशाने सुद्धा ते केले. सीरिया राज्यसत्तेच्या फौजेचा सेनापती नामानला कुष्ठरोग होता. इलिशा या देवाच्या माणसाने विलक्षण चमत्काराने त्याचा कुष्ठरोग बरा केला. (II किंग - ५ : १४)

दृष्टीहिनास डोळस बनवले : पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) आंधळ्या माणसाला दृष्टी असलेला बनवू शकले. हा चमत्कार होता ईशकृपेने इलिशाने देखील दृष्टी नसलेल्या माणसाला दृष्टीदान केले. (II किंग - ६ : १७)

मृतास जिवंत उठवणे : पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) मृतास जीवित करून जिवंत उठवित आणि इलिशाने सुद्धा ते केले. (II किंग - १७ : २१,२२)

मृत बालकास जिंवत करण्यास कारणीभूत : इलिशा मरण पावलेल्या बालकास जीवित करण्यास कारणीभूत ठरला. (II किंग - ४ : ३२-३५)

अल्प भोजन बहुसंख्य लोकांना : पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) यांनी खूप अधिक लोकांना थोड्याशा अन्नाने पोटभर जेऊ घातले. परंतु इलिशानेही ते केले. (II किंग - ४ : ४२-४४)

मृत हाडांना स्पर्श : मृत मनुष्य उठून स्वतःच्या पायावर उभा राहिला. जेव्हा त्याच्या पुरलेल्या शरीरास त्याच्या थडग्यात इलिशाने मृत हाडांनी स्पर्श केला.

(II किंग - १३ : २१)

अपंग व्यक्तीचे उड्या मारणे व चालणे : पॉलने बघितले, एक मनुष्य त्याच्या मातेच्या उदरातून अपंग जन्मला होता. सर्वबाजूने त्याचे निरीक्षण करीत म्हणाले, 'सरळ उभे राहा तुमच्या पायांवर' आणि तो मनुष्य उड्या मारीत चालू लागला.

(अॅक्टस - १४ : ८-१०)

एक काठी मूसाच्या हातात सर्प बनली. (इक्सोडस - ४ : ३)

मूसाचा हात जेव्हा त्याने काखेत घातला आणि बाहेर काढला त्याला चकाकी येऊन तो प्रकाशमान झाला. (इक्सोडस - ४ : ६)

जेव्हा पुनःश्च त्याने (मूसाचा हात) आपल्या काखेत आणि बाहेर काढला. मूसाचा हात पुन्हा पूर्वीसारखा जसाचा तसा झाला. (इक्सोडस - ४ : ७)

# परिशिष्ट 'ड'

## 'पुत्र', 'मुले', 'पिता', 'ईश्वर', 'पवित्र आत्मा' या शब्दांचा बायबलमध्ये प्रयोग

ईश्वराचा पुत्र, ईश्वर, पिता हे शब्द विशाल अर्थाने बायबलमध्ये उपस्थित झाले असून 'ईश्वराची लेकरे' हा वाक्यप्रचारसुद्धा काही ठिकाणी आला आहे. संबंधित श्लोकांकडे पाहताना उघडपणे जाणवते की तो इंग्रजी शब्द मूलत: हिब्रू ते अॅरेमिल ते ग्रीक ते लॅटीन ते युरोपियन भाषा ते इंग्लीश ख्रिस्तीमध्ये प्रचलित तोच अर्थ निर्देशित करीत नाही. जो येशू (त्यांना शांती लाभो) यांच्या तीन शतकांनंतर व्यक्तित्रयात्मक ईश्वर (Trinity) शिकवणीची सुव्यवस्थित रचना नाही. चला, आपण बायबलच्या श्लोकांच्या माध्यमातून त्याचे सत्य दर्शन घेऊ या.

## 'पुत्र', 'सुपुत्रे', 'देवाची लेकरे' आणि 'पिता' अक्षरश: नव्हे तर लाक्षणिक अर्थाने उपयोग.

"आणि स्वामी मूसाला म्हणाला, जेव्हा तुम्ही इजिप्तकडे परत जाल, पाहा फिरऔन पुढे ती सर्व आश्चर्ये सादर करा जी तुमच्या हातात मी सोपविली आहेत. परंतु मी त्याचे अंत:करण कठोर बनविन. म्हणून तो लोकांना मज्जाव करील. मग तुम्ही फिरऔनला सांगावे. अशा प्रकारे स्वामी म्हणतो, 'इस्त्राईल माझे पुत्र, माझे ज्येष्ठ पुत्र आहेत." (इक्सोडस - ४ : २१,२२)

"तो (डेव्हीड) माझ्या नावाने एका निवासस्थानाची रचना करणार आहे. आणि मी त्याच्या नेहमीच्या राज्यसत्तेचा मुकुट कायमचा स्थापित करणार आहे. मी त्याचा पिता होणार आहे आणि तो माझा पुत्र होईल. जर तो अनिष्ठ कृत्य करील ते महापाप ठरेल. मी त्याला माणसांच्या छडीने शासन करीन आणि माणसांच्या पुत्रांना ठोसे लावीन." (सम्युअल - ७ : १३, १४)

"तो (सालोमन) माझ्यासाठी निवारा बांधील आणि तो माझा पुत्र होईल आणि

मी त्याचा पिता होईन आणि मी त्याच्या इस्त्राईलवर नेहमीसाठी त्याच्या राज्यसत्तेचा मुकुट स्थापित करीन.' (I क्रोनिकल्स - २२ : १०)

''ते रूदन करीत आणि विनम्रपणे प्रार्थना करीत येतील. मी त्यांचे नेतृत्व करीन. मी त्यांना पाण्याने भरलेल्या नदीच्या बाजूने सरळ मार्गक्रमण करण्यास कारणीभूत ठरेन. ज्यामुळे ते ठेचाळणार नाहीत. यास्तव इस्त्राईल पिता आणि इब्राहीम माझा मोठा पुत्र होय.' (जरमिहा - ३१ : ९)

''तुम्ही तुमचा स्वामी ईश्वराची लेकरे आहात. तुम्ही स्वत:हून किंबहुना मृतांच्या डोक्याच्या समोरील दाढी काढू नका.'' (ड्यूट्रोनॉमी - १४ : १)

''मी कराराची उद्घोषणा करीन' स्वामी मला उद्देशून म्हणाला, तुम्ही (डेव्हीड) माझे पुत्र आहात, आज मी तुम्हास प्राप्त केले.'' (साम - २ : ७)

''तुम्ही स्वर्गात तुमच्या पित्याचे पुत्र असाल. तो चांगल्या व वाईटावर सूर्योदय करतो आणि पावसाचा वर्षाव करतो. योग्य युक्तीसह जर तुम्ही प्रेम करता, तो तुमच्यावर प्रेम करतो. कोणते बक्षीस आहे तुमच्यासाठी? जर कधी नव्हे कर गोळा करणारा ते करतो! आणि जरी तुम्ही तुमच्या बांधवांचे केवळ स्वागत करता! काय करू शकता तुम्ही दुसऱ्यासाठी? जरी नेहमी कर गोळा करणारा हे करतो. यास्तव तुम्ही परिपूर्ण असाल जसा तुमचा पिता स्वर्गात परिपूर्ण आहे.'' (मॅथ्थीव - ५ : ४५-४८)

''कुणाला एखाद्या गोष्टीचे पूर्वज्ञान असते. तेसुद्धा ईश्वराने आगाऊच कपाळी लिहून ठेवलेल्या त्याच्या पुत्राच्या कल्पनेसाठी, जरी तो ज्येष्ठ पुत्र असेल. शिवाय तो कुणाच्या दैवाने आगाऊच कपाळी लिहून ठेवतो. त्यांना तोदेखील बोलावतो ज्यांना तो साद घालतो. ते बरोबर असल्याचे दाखवतात आणि ज्यांचे तो दोष निवारण करतो त्यांचासुद्धा तो गौरव करतो.'' (रोमन्स - ८ : २९-३०)

''आदमचा सुपुत्र ईश्वराचा सुपुत्र.'' (लूक - ३ : ३८)

''तो (डेव्हीड) मजकडे ओरडेल, त्यालासुद्धा मी माझा ज्येष्ठ पुत्र बनवीन. पृथ्वीवर उंचावरील राजा करीन.'' (साम - ८९ : २६,२७)

## ईश्वराच्या पुत्रांनी पुरुषांच्या कन्या बघितल्या, त्या सुंदर होत्या आणि त्यांनी स्वत:साठी बायकांची निवड केली.

"अद्याप इस्राईलच्या लेकरांची संख्या समुद्रातील वाळूप्रमाणे असेल. जी कदापि मोजमाप किंवा मोजदाद करता येणार नाही. आणि त्या जागी येईल जिथे ते त्यांना म्हणाले होते की तुम्ही माझे लोक नाहीत. ते त्यांना सांगतील तुम्ही जीवित ईश्वराची सुपुत्रे आहात.' (होसिया - १ : १०)

"तो दिवस होता जेव्हा ईश्वराची पुत्रे स्वामीसमोर स्वत: उपस्थित होण्यास येतील आणि सैतानसुद्धा त्यांच्यामध्ये येईल." (जॉब - १ : ६)

"पुन:श्च तो दिवस होता जिथे स्वामीच्या पुढ्यात ईश्वराची लेकरे स्वत:हून उपस्थित होण्यास आली. आणि सैतानसुद्धा त्यांच्यामध्ये स्वामीसमोर स्वत: हजर झाला." (जॉब - २ : १)

"जेव्हा सकाळचे तारे एकत्रितपणे गातील आणि सर्व ईश्वराची पुत्रे आनंदाने ओरडतील!" (जॉब - ३८ : ७)

"येशू राक्षसांना दरडवून ईश्वराचे पुत्र असल्याबद्दल म्हणाला."
(लूक - ४ : ४१)

## केवळ पुत्र आणि सुपुत्रे नव्हे तर ईश्वरकन्या सुद्धा

ईश्वराची पुत्रे, सुपुत्रे या शब्दांचा उपयोग पवित्र बायबलमध्ये अक्षरश:च्या ऐवजी लाक्षणिक अर्थाने झाला नाही. या शब्दांचा पिता आणि कन्या असा प्रयोग झाला आहे.

"मी तुमचा पिता होईन आणि तुम्ही माझे पुत्र आणि कन्या, सर्वशक्तिमान स्वामी म्हणतो." (II कोरिंथिअन्स - ६ : १८)

"मी उत्तरेला सांगेन त्यांना वर सोडा! आणि दक्षिणेस त्यांना मागे ठेऊ नका. माझ्या पुत्रांना आणि कन्यांना पृथ्वीच्या अंतापासून घेऊन या." (आयझाया - ४३ : ६)

## निष्कर्ष

ईश्वरपुत्र म्हणून (लाक्षणिक आशयऐवजी शब्दश: अर्थाने) जर येशू (त्यांना शांती लाभो) वर विश्वास ठेवण्यात येतो. कारण बायबलच्या भाषांतरामध्ये ते अनुवादित करण्यात आले आहे. यास्तव त्याचे व्यक्ती म्हणून ईश्वराचा अवतार आणि स्वत: ईश्वर या नात्याने विश्वास बाळगला जातो. हा अन्य कोणी नव्हे, तर खुद्द बायबलकडून तर्क मोठी समस्या समोरासमोर सूचित केली जाते. पवित्र बायबलमध्ये किमान पाच अन्य पैगंबरांसाठी तसेच सामान्यजनांकरिता तशाच प्रकारचे शब्द आधार म्हणून उपरोक्त प्राचीन व अर्वाचीन दोन्ही करारातील श्लोकांत आहेत.

बायबलच्या श्लोकांच्या प्रकाशात येशू (त्यांना शांती लाभो) यांचे पुत्रत्व आणि त्याची ईश्वराकडून शाश्वती, त्याचे ईश्वराचा अवतार म्हणून स्थान त्याच्या उपासनेचे कमीतकमी कारण नाही. जर ते विश्वास ठेवण्यास योग्य आहे अन्य पैगंबर आणि सामान्य लोकांचा बायबलमध्ये उल्लेख केल्याप्रमाणे पुत्र आणि ईश्वराची पुत्रे म्हणून पूजा करण्यास पात्र होतील.

(धर्मग्रंथाच्या विशिष्ठ लाक्षणिक भाषाशैलीच्या भाषांतरात)

# परिशिष्ट 'इ'

## बायबलनुसार आम्हीसुद्धा पवित्र आत्म्यासह समाधानी

मेरीचे गर्भाशय मानवी पतिशिवाय येशूची गर्भधारणा हे दर्शवित नाही की हे पवित्र आत्म्याचे बीज होते. Triune God अर्थात त्रिदेवचा एक भाग या कल्पनेस कारणीभूत ठरला. परंतु येशू Triune God चा दुसरा भाग असल्याचे मात्र सूचित करीत नाही. बायबलच्या नव्या करारात स्वत: म्हटले आहे. पवित्र आत्म्यानेसुद्धा कित्येकांना तृप्त केले आहे. नवा करार खालीलप्रमाणे वाचला जातो.

"तो (बार्नाबास) एक चांगला मनुष्य होता. पवित्र आत्मा व विश्वासाने समाधानी आणि पुष्कळ मोठ्या लोकांनी स्वामीला प्राप्त केले होते." (ॲक्टस - ११ : २४)

"आणि आम्ही व पवित्र आत्मासुद्धा त्याचे साक्षीदार आहोत. ज्याला ईश्वराने दिलेले आहे जे त्याचे आज्ञापालन करतात." (ॲक्टस - ५ : ३२)

"आणि संपूर्ण जमावास राजी करण्यास सांगून आणि त्यांनी एक मनुष्य पूर्ण श्रद्धा व पवित्र आत्म्यास निवडले." (ॲक्टस - ६ : ५)

"प्रेषित्व मानवी इच्छेने पुन:श्च प्राप्त होत नाही. परंतु पवित्र ईश्वराची माणसे म्हणाली जसे ते पवित्र आत्म्याकडे वळलेत." (II पीटर - १ : २१)

"ती चांगली गोष्ट जी तुमच्या स्वाधीन करण्यात आली, जपून ठेवा जे आमच्या पवित्र आत्म्यात राहतात." (III टिमोथी - १ : १४)

"आणि तो (जॉन बाप्टीस्टा) स्वामीच्या दृष्टीपुढे महान असेल आणि दारू किंवा शक्तिवर्धक पेय या वेळी एकही नाही. तो पवित्र आत्म्याचे जरी तो त्याच्या मातेच्या गर्भातून तृप्त होईल." (लूक - १ : १५)

"आणि ते घडले जेव्हा एलिझाबेथने मेरीचा अभिनंदनपर संदेश ऐकला. ते तान्हेबाळ तिच्या गर्भात उड्या मारू लागले आणि एलिझाबेथ पवित्र आत्म्याने तृप्त झाली." (लूक - १ : ४१)

# परिशिष्ट 'फ'

## बायबल आणि कुरआनच्या शिकवणीत समानता

बायबलमधील अवमानकारक प्रक्षिप्त मजकूर बनावट गोष्टी कीर्तिमान ख्रिस्ती धर्म आणि ईश्वरज्ञानाच्या अभ्यासकांकडून स्वत:[१] मान्यताप्राप्त आहे. पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) यांच्या अनेक शिकवणी जशाच्या तशा अर्वाचीन कराराच्या पानांत आणि अन्य पैगंबरांशी संबंधित प्राचीन करारात उपलब्ध आहेत. अशा प्रकारच्या शिकवणी इस्लामी व कुरआनच्या शिकवणींबरोबर समान आहेत.

खाली दिलेल्या तत्त्यात काही शिकवणी देण्यात आलेल्या आहेत. ज्या बायबलमध्ये (O.T. जुना करार व N.T. नवा करार) उपस्थित असून पैगंबर येशू (त्यांना शांती लाभो) यांनी उपदेशिल्या किंवा त्यांच्याकडून आचरणात आणल्या गेल्या आहेत. परंतु नंतर ज्यांचा चर्चकडून परित्याग करण्यात आला. या परिवर्तनात सेंट पॉल [२] यांची प्रमुख भूमिका राहिली आहे. तथापि या पुष्कळ शिकवणी इस्लामच्या अंतिम संदेशात पैगंबर मुहम्मद (त्यांना शांती लाभो) यांच्यावर ईश्वरी संदेश म्हणून अवतीर्ण झाल्या असून इस्लामच्या धार्मिक अभ्यासाचा मूलभूत भाग या नात्याने आजपर्यंत तद्वत अंतिमदिनापर्यंत अस्तित्वात राहतील. ख्रिस्ती श्रद्धावान कौतुक करतील की इस्लाम बायबलच्या प्रकाशात त्यांना योग्य व उत्कृष्ठ वाटेल. हा आल्हाददायक मार्ग यथार्थपणे व्यवहारवादी इस्लामकडे पोहचण्यासाठी आहे.

---

१. पहा परिशिष्ट 'ग'.

२. पॉल : सुमारे पाच वर्षानंतर येशूच्या उपाध्येपणापश्चात तारसूस येथील सूल एक तरूण ज्यू धर्मगुरू (पॉल त्याचे रोमन नाव) याने दावा केला की त्याने येशूला स्वप्नात पाहिले. त्याचा दृढविश्वास होता बिगर ज्यूज ख्रिस्ती बनल्यानंतर ते तौरातसह ओझे नाहीत. पॉल यांच्या अॅक्टस १३:३९ अनुसार जो येशूविषयी विश्वास बाळगतो मूसाच्या कायद्यापासून मुक्त आहे. त्याने २७ ग्रंथांपैकी १४ नव्या कराराबद्दल लिहिलेत, ज्याचा चर्चने अधिकृत शिकवण म्हणून स्वीकार केला. तो ग्रंथ येशूचे संपूर्ण सत्य म्हणून जपून ठेवण्यात आलेला नाही. किंवा ते पुन्हा सादर झाले नाहीत. पॉलने येशूच्या शिकवणी हेलेनिक (ग्रॅइकी-रोमन) तत्त्वज्ञानात रूपांतरित केल्या. त्याचा येशूच्या उपाध्येपणाच्या शेवटी ३४ वर्षानंतर शिरच्छेद करण्यात आला.

| अ.नं. | कुरआन/इस्लामच्या शिकवणी | बायबलच्या शिकवणी |
|---|---|---|
| १. | अल्लाहचे एकत्व, संपूर्णत: एकेश्वरत्व, मूलभूत आविष्कारात मोठ्या संख्येने कुरआनच्या आयत (उदा. ११२ : १-४) आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांची असंख्य सुवचने. | ईश्वराचे एकमेवत्व बायबलची शिकवण होय. पैगंबर येशू ख्रिस्तांनी शुद्ध एकेश्वरत्व शिकवला आहे. (इक्सोडस २०:३, ३४:१४, टयूट्र ६:४, मार्क १२:२९) |
| २. | पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यासह कुरआनमध्ये उल्लेखित कोणत्याही पैगंबरांनी असे म्हटले नाही की, "मी ईश्वर आहे. माझी उपासना करा." | नाही. बायबलच्या कोणत्याही संदेशवाहकाने येशू (त्यांना शांती लाभो) सह म्हटले नाही, मी ईश्वर, ईशअवतार, ईशपुत्र, ईशअंश, माझी उपासना करा. |
| ३. | अनेकेश्वरत्वाचा इन्कार. (१३:३६, ४:३६, ३:६४, ४:४८-११६, ५२:५३) | अनेकेश्वरत्वाचे खंडन (आयझाया ४३:१०, ४५:६,१८,२२, आयझाया ४४:६, इक्सोडस ८:१०, होसिया १३:४, क्रोनि १७:२०, मॅथ्थीव ४:१०) |
| ४. | व्याजाची देवघेव अवैध ठरविली (२:२७५, २८६) | व्याजाच्या व्यवहारास मनाई (डयट्रोनॉमी २३:१९) |
| ५. | उपवासाचे पालन ईमानधारकांकडून (२:१८३) | येशूने उपवासाचा उपयोग केला आणि मूसाने उपवासाचे पालन केले. (इक्सोडस ३४:८८) |
| ६. | प्रार्थनेपूर्वी शुचिर्भूत होणे अलमदीना ५-६, आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांची सुवचने. | मूसा, हारून शुचिर्भूत झाले. इक्सोड्स (४०:३०) आणि येशूने तौरातच्या शिकवणीचे पालन केले. |

| अ.नं. | कुरआन/इस्लामच्या शिकवणी | बायबलच्या शिकवणी |
| --- | --- | --- |
| ७. | प्रार्थनेसाठी नतमस्तक होणे (सजदा). २५:६०, २७:२५, ४१:३७, ५३:६२, ५०:४०, ७:२०६ | प्रार्थनेच्या दरम्यान नतमस्तक होणे. इक्सोडस ४०:३०,३१, येशूने तौरातच्या शिकवणीचे पालन केले. (मॅथ्थीव २६:३९, जेनिसीस १७:३, नंबर्स १६:२२, २०:६, जोशू ५:१४, ७:६, किंग्ज १८:४२) |
| ८. | स्त्रियांचे बुरखा परिधान करणे. (२५:३१, ३३:५९) आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांची अनेक सुवचने | स्त्रियांचे बुरखा परिधान करणे जेनिसीस २४:६५, ३८:१४, यहुदी महिलेच्या साहित्यात २३९, द्वारा रब्बी डॉ. मेनेचॅम एम. बाएर. |
| ९. | 'अस्सलामु अलैकुम' म्हणून शुभेच्छापूर्वक, अभिवादन, कुरआन सांगतो, त्यांना शांती लाभो ६:५४, ते स्वर्गात प्रवेश करते वेळी देवदूतकडून स्वागत ७:४६ कुरआन म्हणतो, घरात प्रवेश करताना या शुभेच्छादर्शक शब्दाद्वारे गृहप्रवेश करावा. २४:२७ | अभिवादन तुम्हास शांती लाभो जॉन २०:१९, येशूशी संबंधित तुम्हालासुद्धा शांती लाभो, डेव्हीडशी संबंधित, त्याने नबालकडे पाठविलेल्या शिष्टमंडळास अभिवादन करण्यास सांगितले. (सॅम्युअल २५:६) |
| १०. | अनिवार्य उशर व जकातचे सहाय्य (६:१४१, ९:६०) | अनिवार्य मदत जेनिसिस ४१:३४, इक्सोडस २२:२९-३१, टिथे संस्थेचे अनिवार्य सहाय्य, जेनिसिस १४:२०, येशू (यांना शांती लाभो) कडून पुष्टी. |

| अ.नं. | कुरआन/इस्लामच्या शिकवणी | बायबलच्या शिकवणी |
|---|---|---|
| ११. | रक्त सेवनास मज्जाव (६:१४५) | रक्त सेवनास मनाई (जेनिसिस १२:१६, लिव्हिटस १९:२६) |
| १२. | डुकराचे मांस भक्षण अवैध. (२:१७३, ५:३, ६:१४५) | डुकराच्या मांस भक्षणास मज्जाव. (लिव्हिटस ११:७-८, ड्यूट्रोनॉमी १४:८) |
| १३. | दारू पिणे अवैध. (५:९) | दारू सेवनास मनाई. (नंबर्स ६:१-४, लूक १:१५) |
| १४. | सुन्ता करणे (बुखारी, खंड १७ क्र.७१७, मुस्लिम खंड १, क्र.४९५ पान १५९) | जेनिसिस १७:१०-१३, गॅलेटिअन्स ६:१५, लूक २:२१ |
| १५. | बहुपत्नित्वास परवानगी. | बहुपत्नित्वास संमती. |

# परिशिष्ट 'ग'

## बायबलच्या भाषांतरांविषयी

'ईश्वराचा शब्द' संबंधी चुकांची दुरुस्ती, कठीण आणि गंभीर उणिवांबाबत मानवी प्रयत्नांचा इतिहास.

विल्यम टेंडले यांनी हिब्रू व ग्रीकमधून धर्मग्रंथ बायबलच्या नव्या कराराचा प्रत्यक्षरितीने प्रथमत: इंग्रजी भाषांतर तयार केले. इ. स. १५३६ मध्ये त्यांनी हेतूपुरुस्सर केलेल्या अर्थाच्या विपर्यासामुळे धर्मग्रंथांवर दोषारोप झाल्याने ते अग्नीच्या भक्ष्यस्थानी पडले. परंतु त्यांचे कार्य नंतरच्या लोकांसाठी मूलाधार बनले. विशेषत: त्यापैकी पाचजणांनी इ. स. १५३५, १५३७, १५३९, १५६० आणि १५६८ मध्ये (बायबल) तयार केले.

द किंग्ज जेम्स वर्जन (KJV) इ. स. १६११ मध्ये बनवले, (बायबलच्या अभ्यास आणि अतिप्राचीन शोधावर आधारित होते.) या आवृत्तीमध्ये प्रचंड चुका असल्यामुळे बदल करण्याचे ठरले होते.

इ. स. १८८१-१९०१ च्या दरम्यान (बायबलची) अनाधिकृत प्रकाशने होती. ज्यात अनाधिकाराने मूळ पुनरावृत्ती केलेल्या इंग्रजी भाषांतरात अमेरिकन जनतेच्या समाधानासाठी फरक केला होता.

बत्तीस स्कॉलर्ससोबत पन्नास प्रतिनिधींच्या सल्लागार मंडळाच्या समितीने इ. स. १९४६ मध्ये ओ.टी.च्या अंतर्गत असलेला दर्जेदार पुनरावृत्ती भाषांतर स्टॅंडर्ड रिवाईज्ड वर्जन (SRV) आणि इ. स. १९४६ मध्ये ओल्ड टेस्टामेन्ट अन् इ. स. १९५१ मध्ये न्यू टेस्टामेन्ट दोन्ही प्रसिद्ध केले.

हा संक्षिप्त बदल, सुधारणा आणि पर्याय त्याचे सादरीकरण भाषांतरानंतर भाषांतर केवळ ४१६ वर्षात अर्थात (इ. स. १५३५-१९५१) होत राहिले. बायबलच्या दोन हजार वर्षात काय घडले? ही अतिशय महत्त्वपूर्ण कठीण अवस्था व कल्पना आहे. काय घडावयास हवे होते? श्रद्धेबाबत विद्वान व्यक्तीसाठी अर्थपूर्ण चिंतन करण्याची गोष्ट आहे.

अमेरिकन स्टॅन्डर्ड वर्जन (ASV) इ. स.१९०१ ही किंग्ज जेम्स भाषांतराची पुनरावृत्ती होती. (KJV) इ. स. १६११.

विल्यम टेंडले यांनी प्रत्यक्ष भाषांतरद्वारा मूळ हिब्रू व ग्रीकपासून प्रथम इंग्रजी भाषांतर तयार केले.

हेतूपुरस्सर धर्मग्रंथाच्या अर्थाचा भलताच अर्थ केल्यामुळे दोषारोपामुळे त्यांचा नवीन करार जाळण्याचा आदेश झाला. ते ऑक्टोबर १५३६ मध्ये जाळून टाकण्यात आले.

टेंडलेच्या इंग्रजी भाषांतराचे सेवाकार्य मागाहून येणाऱ्यांसाठी आधार बनले. विशेषत: त्यापैकी,

१. कव्हरडले इ. स. १५३५

२. थॉमस मॅथ्थीव इ. स. १५३७

३. ग्रेट बायबल इ. स. १५३९

४. जिनेव्हा बायबल इ. स. १५६०

५. बिशपचे बायबल इ. स. १५६८

६. N.T. चे भाषांतर रोमन कॅथोलिक स्कॉलर्सकडून लॅटीन व्हीयूलगेढ रेहीम्स येथे इ. स. १५८२ मध्ये प्रकाशित झाले.

किंग्ज जेम्स वर्जनमध्ये भारदस्त उणिवा... बायबलचा अभ्यास व विकास तद्‌वत अनेक हस्तालिखितांचा शोध खूप प्राचीन ज्यावर KJV आधारित होते. त्या हस्तलिखितात पुष्कळ दोष खूप गंभीर म्हणून इंग्रजी भाषांतराची पुनरावृत्ती इ. स. १८७० मध्ये चर्च ऑफ इंग्लंडच्या प्रमुखाकडून स्वीकारण्यात आली होती.

इंग्लीश रिवाईज़्ड वर्जन ERV इ. स. १८८१-१८८५ मध्ये प्रकाशित झाले.

अमेरिकन स्टॅन्डर्ड वर्जन ASV दृश्य स्वरूपात अमेरिकन स्कॉलर्सची पसंती व एकमताने इ. स. १९०१ मध्ये प्रकाशित झाले. म्हणून ASV ग्रंथावरील हक्क इ. स. १९२८ मध्ये इंटरनॅशनल कौन्सिल ऑफ रिलीजन एज्यूकेशनला देण्यात आला.

सार्वजनिक व खाजगी प्रार्थनांसाठी मुद्दाम धर्मग्रंथाच्या इंग्रजी भाषांतराची गरज लक्षात घेऊन (ICRE द्वारा नियुक्त कमिटीच्या शिफारसीनुसार) इ. स. १९०१ मध्ये प्रकाशित चुकीच्या आवृत्तीने जनप्रबोधनासाठी पुन:श्च लोकांना समजेल असे सुबोध प्रकाशन करण्याचे ठरले.

बत्तीस स्कॉलर्सनी कमिटीचे सदस्य म्हणून सेवा दिली होती. सल्लागार

मंडळात पन्नास प्रतिनिधींसमोर निवेदन करण्यात आले होते. कमिटीने दोन विभागांत कार्य पार पाडले. एकाने ओ.टी. बरोबर तर दुसऱ्याने एन.टी. या विभागाने आपले काम अन्य विभागाच्या सदस्यांच्या चौकशीने दाखल केले. कमिटीने एकूण सदस्यांच्या २/३ मतांनी पूर्ण परिवर्तनाच्या सहमतीचा अधिकार दिला.

N.T. चे दर्जेदार भाषांतर (RSV) इ. स. १९४६ मध्ये प्रकाशित झाले होते. अमेरिकेच्या नॅशनल कौन्सिल ऑफ चर्चेस ऑफ ख्राईस्टच्या मताने O.T. आणि समावेश असलेले RSV चे प्रकाशन अधिकृत होते.

पुष्कळशा सुधारणा स्वीकारण्यात आल्या. ज्या प्राचीन भाषांतरावर आधारित होत्या. (ग्रीक, अरॅमिक, सिरियक आणि लॅटीन भाषांतर)

तीनशेपेक्षा अधिक इंग्रजी शब्द जे KJV मध्ये वापरात आली. आज आशय म्हणून मुख्यत: विभिन्न अर्थ ध्वनित करतात.

काही शब्द किंवा वाक्यप्रचारांचा बदल करण्यात आला. जे RSV मध्ये दृग्गोचर होतात. भाषांतराची दृढता, निर्मळता किंवा अचूकता म्हणून उदा. जॉन १९:२६, मॅथ्थीव ७:९, कोरिंथिअन्स १०:१७, मॅथ्थीव २१:९, २७:५४, मार्क १५:३९, जॉन १६:२३, I कोरिंथिअन्स १५:१९, I टिमोथी ३:२, १२:९ आणि टायटस १:६

(Excerpts from the Preface (pp-iii to vii, of the Holy Bible - Revised Standard Version - Thomas Nelson & Sons, Condon, Toranto - 1959.

Translated from the ORIGINAL TONGUES Being the Version set forth C.E. 1611, Revised C.E. 1881-1885 and C.E. 1901 compared with the most ancient Authorties and revised C.E. 1946-1952)

# परिशिष्ट 'ह'

## कुरआनची ऐतिहासिक सत्यता

दिव्य कुरआन इतिहासाच्या संपूर्ण उजेडात अवतीर्ण झालेला केवळ ईशधर्मग्रंथ आहे. पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर केव्हा आणि कोठे त्याच्या अवतरणास प्रारंभ झाला? कधी आणि कोणत्या स्थळी ते परिपूर्ण झाले? त्यांची नोंद आणि जपणूक कशा प्रकारे करण्यात आली? हा अत्यंत महत्त्वपूर्ण मुद्दा अन् प्रश्न विचार करण्यासारखा आहे.

दिव्य कुरआनाचे शुभावतरण ईशदूत जिब्रिलद्वारा पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर १७ ऑगस्ट इ. स. ६१० मध्ये तेजोमय पर्वत 'जबल-ए-नूर'चे सर्वोच्च शिखर 'हिरा' नामक गुहेत झाले.

पैगंबरांच्या मक्का नगरीतील निवासस्थानापासून ३-४ किमी अंतरावरील गुहेत हे अवतरण झाले. वयाच्या चाळीसाव्या वर्षी या स्थळाचा उपयोग वास्तव्य करून ईशचिंतनाद्वारे जीवनाची सत्यता जाणून घेण्यासाठी करीत असत. त्याचे अस्तित्व, त्याची सृष्टी आणि ईश्वर व मानवाचे नाते कसे आहे? त्यांना सर्वप्रथम ईशसंदेश वयाच्या चाळीस वर्षे अकरा दिवसांनी प्राप्त झाला.

मदीना शहरात मार्च इ. स. ६३२ मध्ये जगाचा निरोप घेण्यापूर्वी तीन महिने अगोदर ईशअवतरणाची समाप्ती झाली.

पैगंबरांवर अवतरित झालेला प्रत्येक श्लोक व आयतीचा एकेक शब्द मोठ्या औदार्याने चार मार्गांनी जपून ठेवण्यात आला होता.

१) प्रथमस्थळी झालेल्या अवतरणाची ईश्वरद्वारा मुखोद्गत पाठांतराची विशेष व्यवस्था पैगंबरांकडून करवून घेण्यात आली. (जसे कुरआन त्याची ग्वाही देतो. अल् कियामह १५-१६)

२) पैगंबरांच्या सोबत्यांकडून श्लोक त्वरित लेखन करवून घेण्यात येई. पैगंबर स्वतः माहिती व सूचना देऊन मजकूर लिहून घेत असत. अशा कुरआनच्या लेखनिकांची संख्या ४१ नोंदण्यात आली आहे. त्यांच्या वडिलांची नावे आणि टोळीचा परिचयसुद्धा देण्यात आला आहे.

३) प्रत्येक अवतीर्ण झालेल्या आयत व श्लोकाचे पाठांतर किंवा कुरआनचा काही भाग काही सोबत्यांकडून संस्मरण व पाठांतर करून घेण्यात आला. या पद्धतीमुळे गेल्या चौदाशे वर्षांपासून चिरस्थायी, अखंडीत व सातत्याने कुरआनाची जपणूक होऊन आजसुद्धा त्याचे दशलक्ष पाठांतरकार (हुफ्फाजुल कुरआन) उपलब्ध आहेत. ज्यांच्या हृदयपटलावर संपूर्ण कुरआन पूर्णपणे स्मरणात सुरक्षित आहे.

४) समस्त जगातील मुस्लिमांना कुरआनचा काही भाग दिवसातील पाचवेळच्या अनिवार्य आणि ऐच्छिक नमाजकरिता तोंडपाठ म्हणणे आवश्यक आहे. याशिवाय अखंड कुरआन बंधनकारक उपवासाच्या रमजान महिन्याच्या रात्री तरावीहच्या वैयक्तिक आणि सामुदायिक नमाजमध्ये क्रमशः पठण व श्रवण करणे जरूरी आहे. मागील १४५० वर्षांपासून या सर्व प्रार्थनांमध्ये त्याला केंद्रस्थानी महत्त्वाचे स्थान प्राप्त आहे. त्याचप्रमाणे मूलभूत कुरआनाची सातत्याने जपणूक आणि माहिती सचेतन ठेवली जाते.

पैगंबरांनी आपल्या स्वतःच्या जीवनात संपूर्ण कुरआनचा स्वीकार केला आणि तिसरे खलीफा उस्मान इब्ने अफ्फान (रजि.)ङ यांनी या धर्मग्रंथाच्या सात प्रती तयार करून इस्लामी राज्याच्या महत्त्वाच्या ठिकाणी पाठविल्या. त्यापैकी काही मूळ प्रती अद्यापसुद्धा ताश्कंद, इस्तंबूल आदी ठिकाणच्या वस्तूसंग्रहालयात सुरक्षित राखून ठेवण्यात आलेल्या आहेत. महापद्म संख्येने कुरआनच्या अन्य प्रती आज पृथ्वीच्या प्रत्येक भागात उपलब्ध आहेत. त्याची तपासणी मूळ प्रतीशी केली जाते. एखाद्यास आश्चर्य वाटेल की दोहोंत एका शब्दाचादेखील कोणताही फरक यात पाहावयास मिळणार नाही.

# या ग्रंथाविषयी

अशा वेळी जेव्हा व्हॅटीकन मुस्लिम स्कॉलर्स सोबत सुसंवाद चालू ठेवण्यास सहमत झाले. सिंहावलोकनार्थ आलेला प्रस्तुत ग्रंथ प्रसंगोचित क्षणी आला आहे. अल्लाहने सर्वोच्च पसंती दिलेल्या दोन महान आत्मा येशू आणि मेरीसंबंधी कुरआनद्वारा प्रसृत आवश्यक माहिती हा ग्रंथ सादर करतो.

सदर ग्रंथ त्या महान आत्म्यांना सस्नेह समर्पित आहे जे शाश्वत, परिपूर्ण आणि अंतिम सत्याच्या शोधार्थ प्रेम करीत राहिले. खरोखर एक अत्यंत सुंदर समर्पण!

पवित्र कुरआनातून येशू आणि मेरी यांच्याशी निगडीत उताऱ्यांची निवड ऐट मिरवण्याचा प्रश्न नसून आपले म्हणणे संक्षिप्त व थोडक्यात प्रभाविपणे मांडण्याचे भयंकर कार्य लेखकाने उत्कृष्टरित्या चोखपणे बजावले आहे. ते दृग्गोचर होते. त्याच्या स्वत:च्या परिशिष्टात अतिशय महत्त्वाची ख्रिस्ती संकल्पनेची माहिती जे खूप कठीण काम करण्याच्या प्रयत्नाचे वलय होते. त्यांनी बायबलमधून समर्पक सचित्र मुद्दे उद्धृत केले आहेत. या भागात विपूल वेचांची धनसंपदा उपलब्ध आहे.

अत्यंत दक्षतापूर्वक स्पष्टीकरणे संकलित केली आहेत.

ऐतिहासिक कारणाने खूप दुर्बोध ट्रिनिटीची शिकवण स्पष्ट आणि विश्वासाहर्यपणे दिली आहे.

सारांश, संपूर्ण ग्रंथ अर्थपूर्ण आणि विचार करण्याजोगा, माहितीने परिपूर्ण असून जो विस्तार व प्रसार होण्यास पात्र आहे.